

# गर्द

## अनिल अवचट

प्रस्तावना
डॉ. आनंद नाडकर्णी



श्रीविद्या प्रकाशन
२५० शनिवार, पुणे ३०

गर्द

**प्रकाशक :**
उपेंद्र दामोदर कुलकर्णी
श्रीविद्या प्रकाशन
२५० क/१६, शनिवार पेठ,
पुणे - ४११ ०३०.
दूरध्वनी : (०२०) २४४५ ८४५५



**प्रकाशन काल:**
प्रथमावृत्ती : ७ मे १९८६
द्वितीय आवृत्ती : २६ जानेवारी २०१०

**मुखपृष्ठ व आतील चित्रे** : सुभाष अवचट

**मूल्य** : रुपये १५०/-

**मुद्रक :**
आनंद लिमये
इंडिया प्रिंटिंग वर्क्स
इंडिया प्रिंटिंग हाऊस,
४२ जी. डी. आंबेकर मार्ग,
वडाळा, मुंबई -४०० ०३१.
दूरध्वनी : (०२२) ६६६२ ४९६९
इमेल : ipw@vsnl.net

सर्व व्यसनमुक्तांना
मित्राची
छोटी भेट



## चार शब्द

माझ्या मित्राचा तरुण मुलगा या व्यसनात सापडला.
ते चित्र डोळ्याने पाहिल्यावर मी या विषयाकडे ओढला गेलो.
गेल्या दिवाळीच्या सुमारास हे कळलं. त्यानंतर डॉ. आनंद नाडकर्णीला भेटलो. नंतरचे महिना दोन महिने पुण्याहून मुंबईला जाऊन येऊन हे विश्व पाहू लागलो. पुण्यात व इतर शहरांमध्येही याबाबतीत गाठीभेटी घेतल्या. या सगळ्यावर दीर्घ लेख लिहिला. त्याचा अर्धा भाग ' महाराष्ट्र टाईम्स ' या दैनिकात २३ मार्चपासून क्रमशः छापून आला. उरलेल्या भागात ही नंतर भर घालून हे पुस्तक लिहिले आहे.

या पुस्तकास मी आनंद नाडकर्णीकडे प्रस्तावना मागितली.
त्याच्याच सांगण्यावरून त्याची प्रस्तावना पुस्तकाच्या शेवटी
' पुस्तक मिटण्यापूर्वी ' या शीर्षकाखाली टाकलेली आहे. या विषयाचा मला झालेला एक फायदा म्हणजे आनंदशी जमलेला स्नेह. त्याच्याबरोबर राहताना फार वर्षांनी ' हाऊसमन 'चं जीवन थोडं अनुभवलं. परत परत गेल्यामुळे तिथं ॲडमिट झालेले किंवा ग्रूप थेरपीला येणारे व्यसनमुक्त ओळखीचे झाले. काहींची तर दोस्तीही झाली. जवळच्या मित्राला सांगाव्यात तशा त्यांनी त्यांच्या हकिगती मला सांगितल्या त्यामुळेच या प्रश्नाचे दर्शन मला होऊ शकले.

या विषयाबाबत मला डॉ. राजेंद्र बर्वे, डॉ. विद्याधर वाटवे,
माझी बायको डॉ. सुनंदा अवचट या सायकियाट्रिस्ट मंडळींची बरीच मदत झाली. माझा मित्र (अलिकडे खूपच गाजत असलेला) पो. इ. मधुकर झेंडे याने या मादक द्रव्यांच्या व्यापाराबद्दल, नारकॉटिक कायद्याबद्दल माहिती सांगितली. ' गर्द 'च्या धंद्याबद्दल माहिती घेताना पुण्याच्या नारकॉटिक सेलचे सब इन्स्पेक्टर दिलीप शिंदे व एक मित्र श्री. शरद माडीकर यांची खूप मदत झाली.

कुठलाही लेख लिहिल्यावर काही मित्रांना तो वाचायला देऊन
त्यांचं मत मी घेत असतो. या लेखाच्या बाबतीत सुमित्रा भावे, प्र. ना. परांजपे व व. द. देशपांडे यांच्या मतांचा मला खूप उपयोग झाला.

ही लेखमाला मोठी असूनही ती ' महाराष्ट्र टाईम्स 'सारख्या
सुप्रसिद्ध दैनिकात प्रसिद्ध झाली. ह्याबाबतीत संपादक श्री. गोविंद तळवलकर व दिनकर गांगल यांनी खूपच रस घेतला.

या प्रश्नासंबंधीची बरीचशी पुस्तके पुण्याच्या ब्रिटिश लायब्ररीत वाचायला मिळाली. त्याबाबतीत लायब्ररियन श्री. वर्तक व श्री. जोशी यांनी मदत केली. या प्रश्नाच्या अभ्यासकांना जर अद्ययावत पुस्तकांची सूची हवी असल्यास ती ब्रिटिश लायब्ररीत उपलब्ध आहे.

लेखमालेचे पुस्तक काढायचे ठरल्यावर श्रीविद्या प्रकाशनाच्या मधुकाका व उपेंद्र कुलकर्णी यांनी धडाडीने व हौसेने एका महिन्यात छापून पूर्ण केले. माझा धाकटा भाऊ सुभाष याने एका नवीनच शैलीत मुखपृष्ठ व आतील चित्रे करून दिली. किर्लोस्कर प्रेसच्या चंद्रकांत फडके व त्यांच्या सहकाऱ्यांनी अग्रक्रम देऊन हे काम उत्तम रीतीने पुरे केले.

या सगळ्यांमुळे हे पुस्तक या स्वरुपात आपल्या पुढे आलेले आहे. या सर्वांचा मी अतिशय आभारी आहे.

पुस्तकामुळे काय होणार ?

सगळ्या जगात वाढत असलेले व्यसन आपण कसे रोखणार ? असे अनेक प्रश्न लोकांच्या मनात आहेत.

एखादं पुस्तक इतक्या मोठ्या सामाजिक प्रश्नाला रोखत नसतं हे खरंच आहे.

पण या प्रश्नाच्या सुरुवातीच्या अवस्थेत याबाबत कुणी जागं केलंच नव्हतं, असं होऊ नये म्हणून हे पुस्तक.

पुणे
७ मे, १९८६

—अनिल अवचट



## दुसरी आवृत्ती, काही आठवणी

पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत मी लिहिलं होतं, 'पुस्तकामुळे काय होणार ?' या प्रश्नाचेच मला दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना लिहायला उद्युक्त केलंय. त्यानंतर बरंच काही घडलं. हे पुस्तक वाचून पु. ल. आणि सुनीताबाई देशपांड्यांनी या मुलांसाठी काहीतरी करा, असा आग्रह धरला. देणगी देऊ केली. सुनंदाने धाडसाने यांच्या उपचारांसाठी उपचार केंद्र काढू, म्हटले. पु. लं. नीच 'मुक्तांगण व्यसनमुक्ती केंद्र' असे त्याचे नामकरण केले. ते केंद्र सुरू झाल्यापासून आजतागायत व्यसनी मित्रांना मदत करीत आहे. सुमारे १८,००० रुग्णांवर उपचार पूर्ण केलेत. त्यातून अंदाजे दहा हजार रुग्ण आजपावेतो व्यसनापासून दूर आहेत.

हे पुस्तक हौसेने छापणारे मधुकाका कुलकर्णी आज हयात नाहीत. काय उत्साह होता त्यांचा. वय वृद्धतेकडे झुकले असेनाका, तब्येतीच्या अनेक तक्रारी, दुखणी असूनही, हे सगळे त्यांचा उत्साह कमी करू शकले नाहीत. आठवड्याला एक पुस्तक प्रकाशित करण्याचा झपाटा, दर शुक्रवारी त्यांची मुंबईची फेरी, त्यांचा डेक्कन क्वीनमधला ग्रूप, त्यांची आपसातली थट्टा-मस्करी... सगळेच आश्चर्यकारक. त्यांचा माधव गडकरी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, गोविंद तळवलकर, सुभाष भेंडे, रेखा देशपांडे आदींशी स्नेह... किती सांगावे ? पुस्तकांचे, पुस्तकांच्या प्रकाशन समारंभांचे देखणे रूप... या गर्द पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाच्या अखेरीस त्यांनी केलेला की अभावितपणे झालेला विनोद आठवतो. 'आज या निमित्ताने बाहेर 'गर्द'च्या विक्रीची व्यवस्था केली आहे' असं ते म्हणताच सभागृहात हास्यस्फोटच झाला. ते माझ्या गावाजवळ असलेल्या 'पिंपरी पेंढार'चे. तिथल्या शाळेसाठी ते खूप खर्च करायचे. मला एकदा मुलांसमोर भाषणासाठी बोलाविले होते. पुण्यात कधी माझी आई राहायला आली, की ती हुलग्याच्या पिठाची शेंगोळी (हा खास तिकडचा पदार्थ) करायची आणि आम्ही मधुकाकांना जेवायला बोलवायचो. काय प्रेमाने ते जेवत असत. आसपासच्या आम्हा सगळ्यांना प्रकाशित होणारी सगळी पुस्तके सढळ हाताने भेट देत असत. मला

कित्येकदा हा अव्यवहारीपणा वाटे; पण म्हणूनच ते मला आवडत. मी त्यांची, माझं वय त्यांच्यापेक्षा खूप लहान असूनही, खूप थट्टा करीत असे आणि ते छान ती स्वीकारत असत.

या पुस्तकाला आणि मुक्तांगणलाही त्यांचे हात लागलेले आहेत. माझे अनुभव त्यांनी पु. लं.बरोबर फिरायला जाताना (आणि हो, त्यांचे ते प्रसिद्ध टेकडी मंडळ, आणि फिरून आल्यावर 'रुपाली'मध्ये नाश्ता, हे राहिलंच की) सांगितले. त्या दुपारीच पु.लं.चा आम्हाला बोलावल्याचा फोन आला.

मुक्तांगण वाढले, कार्यक्षमतेने चालले. भारतातले ते सर्वोत्तम केंद्र ठरले. या सगळ्या वाटचालीत सुनंदा गेली. मधुकाका गेले, पुं. ल. गेले आणि आता सुनीताबाईही; पण हे सगळे हजारो लोकांच्या अंधाऱ्या घरात दिवे लागून गेले.

धाकटा भाऊ सुभाषनेही आतली बाहेरची चित्रे अशी रेखाटली आहेत, की चटकाच बसावा. मला पूर्वी लोक विचारत, तुम्ही अनेक विषयांवर लिहिता, त्याचे पुढे काय होते ? या पुस्तकानंतर हा प्रश्न मला कुणी विचारत नाही. हे या पुस्तकाचे भाग्य !

**अनिल अवचट**

# १

मुंबईचे के. ई. एम. हॉस्पिटल. पिवळट खाकी रंगाच्या दगडांची तीनचार मजली इमारत. चौकाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेली. आवारात बऱ्याच बकाल माणसांची गर्दी. त्यातनं अधूनमधून जा–ये करणारे पांढरे शुभ्र ॲप्रन्स घातलेले मेडिकल स्टुडंटसचे घोळके. दारावर आत ठिकठिकाणी निळ्या जर्द ड्रेसातले चौकीदार.

आतल्या सगळ्या भिंतींना निम्म्या उंचीपर्यंत पांढऱ्या टाइल्स बसवल्या होत्या. पण कुठल्याही जनरल हॉस्पिटलमध्ये असते तशी आजूबाजूला अस्वच्छता आणि घाण होतीच. जनरल हॉस्पिटलचा एक टिपिकल वास असतो, तो येथेही आला. जिन्याने वर चढून पंधरा नंबरची ओ. पी. डी. शोधून काढली. आत टेबलाभोवती ओणव्या झालेल्या पेशंटसच्या गर्दीतून डॉ. आनंद नाडकर्णीचा चेहरा दिसला.

तेवढ्यात त्यानेही मला पाहिले. हसला. बाजूच्या खुर्चीकडे बोट दाखवून म्हणाला, ' बस. गर्दचा पेशंट आला की दाखवतोच, तोपर्यंत इतर पेशंट उरकून घेतो. '

हा आनंद, तो लहान असल्यापासून माझ्या ओळखीचा. मध्ये बरीच वर्षं गाठ पडली नाही. गेल्या वर्षी भेटला तेव्हा तो एम. डी. ला गोल्ड मेडल मिळवून सायकियाट्रिस्ट झाला होता. उंच, गोरा, जाडजूड आणि सतत हसरा चेहरा असलेला हा तरुण. आनंद ब्राऊन शुगर ऊर्फ गर्दच्या ॲडिक्शनमध्ये सापडलेल्या तरुण मुलांमध्ये बरंच काम करतोय असं ऐकलं तेव्हा त्याला भेटायचं ठरवलं.

मधे मी दिवाळीच्या सुट्टीत ठाण्याला गेलो तेव्हा त्याच्या घरीच गेलो. तिथं तो निवांत भेटला. हा विषय काढताच त्यानं ड्रॉवरमधनं टिचभर आकाराची प्लॅस्टिकची एक बाटली काढली. ती खालून वर रुंद होत गेली होती. वर लाल रंगाचं झाकण होतं. आत पिठासारखी दिसणारी जरा काळपट किंवा ऑफव्हाईट रंगाची पावडर होती. आनंद म्हणाला, ' हीच ब्राऊन शुगर. मुंबईच्या स्थानिक भाषेत याला ' गर्द ' म्हणतात. किंवा सॉफिस्टिकेटेड क्लासमध्ये म्हणजे पेडर रोड, बांद्रा यासारख्या भागातली पोरं याला ' स्मॅक ' म्हणतात. पण पावडर ती एकच. '

' ब्राऊन शुगर म्हणजे हेरॉईन ना ? '

' प्युअर हेरॉईनचा रंग पांढरा असतो. ती पावडर फार महाग असते. इथं आल्यावर त्यात इम्प्युरिटीज मिसळतात. त्यामुळे त्याचा रंग असा बनतो.

' इम्प्युरिटीज काय काय ? '

' रॅट पॉइझन कुटून टाकतात. धोतऱ्याच्या बियाही कुटून टाकतात. काम्पोज पावडर, खडूची पावडर असंही टाकतात. '

मला धक्काच बसला. आतापर्यंत चहात लाकडाचा भुस्सा, किंवा खतात बारीक वाळू, तांदुळात बारीक पांढरे खडे असल्या पदार्थांची भेसळ होते असं ऐकलं होतं. पण भुस्सा, वाळू हे पदार्थ निरुपयोगी असले तरी निरुपद्रवी तरी आहेत. इथं सगळं उलटंच.

मी विचारलं, ' याच वस्तूंची भेसळ का करतात ? कदाचित त्यामुळे नशेत भर पडत असेल. कोण जाणे. '

आनंदला म्हटलं, ' अलीकडे पण पेपरातनं, टी. व्ही. वरनं या ब्राऊन शुगरचा फार गवगवा ऐकू येतो, नाही ? '

' प्रचार चाललाय, पण अजून तो इफेक्टिव्ह होत नाही. या व्यसनाची सर्वांत भयंकर गोष्ट म्हणजे पाच वेळा तुम्ही ब्राऊन शुगर ओढलीत की तुम्ही कायमचे ' हुक ' होता. दुसऱ्या कुठल्याच ड्रगला येवढी ॲडिक्टिव पॉवर नाही. दुसरं म्हणजे इंपोटन्स. ही गोष्ट प्रचारातनं बिंबवली जात नाही. तिसरी गोष्ट म्हणजे दोनपाच वर्षांत हुकमी मृत्यू. या व्यसनाने नपुंसकत्व येतं हेही फारसं प्रोजेक्ट केलं जात नाही. '

' तू त्या सरकारी कमिटीत आहेस ना ? '

' आहे ना. कालच ती मीटिंग अटेन्ड करून आलो. पोलिस–कमिशनर सोमण आहेत. त्यांना याबद्दल सॉलिड इंटरेस्ट आहे. पण बाकी कुणाला फारसा नाही. सरकारी डिपार्टमेंटसमध्ये कोऑर्डिनेशन नावाची भानगड फार कठीण असते. या प्रश्नात पोलिस, प्रोहिबिशन डिपार्टमेंट, हेल्थ डिपार्टमेंट हे सगळे इनव्हॉल्व्ह आहेत. मीटिंगमध्ये काय काय ठरतं. पुढच्या मीटिंगची तारीख ठरते. मधल्या काळात कुणीच काही करत नाही. मी त्यांना म्हणतो, 'प्लॅन ऑफ ॲक्शन ठरवा. त्याप्रमाणे धाड धाड आपण करत जाऊ या. मग ते डिपार्टमेंटल, प्रोसीजरल डिफिकल्टीज बाहेर काढतात. खरं तर माझ्या ताब्यात एखादी जीप, फोन आणि काही माणसं दिली तर मी मुंबईत प्रचाराची धमाल उडवून देईन. '

' सध्या के. ई. एम. मध्ये काय करत असतोस तू ? '

' मी तिथं लेक्चरर आहे. ' डी–ॲडिक्शन ऑफिसर ' म्हणून पोस्ट दिलीय



मला. पण सायकियाट्रिक वॉर्डमधील फक्त दहा–बारा बेडस दिली आहेत या कामासाठी. लोड तर खूप आहे. तिथं आम्ही ॲडिक्टला आठ दिवस ॲडमिट करतो. पहिल्या दोन–तीन दिवसांत त्याला गर्द मिळालं नाही की सॉलिड त्रास होतो. त्याला आपण विथड्रॉल म्हणतो तर व्यसनी लोक टर्की म्हणतात. तो आम्ही कंट्रोल करतो. मग त्याच्याशी बोलून त्याचा प्रॉब्लेम शोधून काढतो. मग कॉन्फिडन्स देऊन त्याला डिसचार्ज करतो. नंतर आठवड्यातून दोनदा ग्रूप थेरपीच्या मीटिंग असतात, त्या अटेन्ड करायला सांगतो. या सगळ्या फॅसिलिटीज फार कमी आहेत. लोड खूप आहे. लोकांना परत पाठवावं लागतं. कारण दर ओ. पी. डी.त आम्ही चार–सहाच केसेस ॲडमिट करू शकतो आणि पेशंट मात्र पंधरा–वीस असतात. '

मी मनात म्हटलं, खरं तर याच्यासारख्याच्या ताब्यात शंभर खाटांचं वॉर्ड तावडतोब सोपवायला हवं.

' मला या ॲडिक्टसशी बोलता येईल का ? '

' हो.अगदी मोकळेपणाने बोलतात ते. तू सोमवारी किंवा बुधवारी ओ. पी. डी.ला ये. तिथं तुझी–त्यांची गाठ घालून देतो. '

० ० ०

आनंदचे सायकियाट्रीचे पेशंट संपत होते. मागे बाकावर तीन–चार तरुण मुलं येऊन बसली होती. त्यांचे चेहरे वेगवेगळे असले तरी भाऊ भाऊ वाटावेत असं त्यांच्यात साम्य होतं. सगळ्यांच्या डोळ्याभोवतीची अर्धापाऊण इंच रुंदीची कातडी काळी पडलेली होती. सगळ्यांचे ओठ काळे पडलेले होते. खालचा ओठ जरा जास्त सुजून, मध्ये पन्हाळी करून खाली लोंबत होता. त्यांच्या डोळ्यावरच्या पापण्या जड होऊन अर्धवट खाली आलेल्या होत्या. बुबुळाभोवतीचा पांढरा भाग गढुळलेला होता. नजरेत चमक, तरतरी नव्हती. भिरभिरल्यासारखे इकडेतिकडे पाहत होते. या मुलांबरोबर एकेक मोठं माणूसही होतं. कुणाचा भाऊ, कुणाची आई, कुणाचा मित्र, असे ते असणार. ते हातात केसपेपर घेऊन आनंद कामातून मोकळी व्हायची वाट पाहत होते.

त्या मुलांकडे बोट दाखवून आनंद म्हणाला, ' हे आपले नारकॉटिक्स. ' त्यातल्या एका मुलाला त्यानं खूण करून आमच्या दोघांच्या खुर्च्यांमध्ये असलेल्या स्टुलावर बसायला सांगितलं. बाप किंचित ओणवा होऊन उभा राहिला.

आनंदनं विचारलं, ' किती वर्षं गर्द घेतोयस ? '

त्या मुलानं व्हिक्टरीच्या आकाराची दोन बोटं करून दाखवली.

' कशामुळं सुरुवात झाली ? '

' दोस्तीतनं. '

' आता रोज किती क्वार्टर लागतात ? खरं सांगायचं हां.' ' दहा. '

मी विचारलं,' दहा ' क्वार्टर्स म्हणजे किती रुपये खर्च ? ' आनंद म्हणाला, ' कमीत कमी शंभर रुपये '

मी आश्चर्यानं विचारलं, ' रोजचे ? '

मुलानं मान हलवली. बाप म्हणाला, ' एक दिवस खाडा चालत नाही. घरातल्या वस्तू विकून घर साफ करून टाकलंय यानं. मी तर याच्या पायी शेवटी वैतागून गेलो. याला घरातनं काढून लावला. '

' कुठं गेला मग हा ? '

' डोंगरीला.'

आनंद म्हणाला, ' या बऱ्याच मुलांचं मी बघितलंय की जेव्हा सगळे मार्ग संपतात तेव्हा मग ते डोंगरीला एका अड्ड्यावर जाऊन पडतात. '

' अड्डा म्हणजे काय आहे तिथं ? '

बाप म्हणाला, ' मी सांगतो. कारण याला शोधायला मी तिथंच गेलो होतो. वरनं काही लक्षात येत नाही. पण आतल्या बाजूला नुसत्या शेडस आहेत. तिथं ही असली व्यसनी पोरं जाऊन पडलेली असतात. तिथं अड्डेवाले लोक यांना गर्द पुरवतात आणि त्या बदल्यात गर्द इकडून तिकडं पोचवायची कामं करून घेतात.'

' हा धंदापाणी काय करतो ? '

बाप म्हणाला, 'खेळणी विकायचा. म्हणजे मी घरी तयार करायचो आणि हा दुकानदारांना सप्लाय करायचा. पण पुढं मग व्यसनासाठी त्यानं बऱ्याच लोकांचे पैसे उसने घेतले. बनवाबनव्या केल्या. मला याचा इकडं पत्ताच नाही. याच्या या व्यवहारांपायी ती सगळी गिऱ्हाइकं तुटली. त्यामुळं याचा धंदा बसला, त्या बरोबर माझाही बसला. आता मीही बेकारच. थोरल्या मुलाची टॅक्सी आहे. त्याचा संसार वेगळा आहे. तरी तो थोडे पैसे पुरवतो. त्यातनं कसंतरी भागवतो. संसार कितीही गरिबीत चालवता येईल. पण हे व्यसन कसं निभवता येणार ? म्हणून शेवटी इथं आणलं. '

आनंदनं त्यांना सांगितलं, ' मी आत्ता ॲडमिट करतो. पण दोन- तीन दिवस त्रास होईल. आम्ही तो त्रास कमी करायचा प्रयत्न करू. तरी त्रास होणारच. काय सहन करणार ना ? '

बावरलेल्या लहान मुलासारखा चेहरा करून त्या पोरानं होकारार्थी मान हलवली.



' याच्याबरोबर तुम्ही कोणीतरी याला सांभाळायला राहायला पाहिजे. ' बापानं मान डोलावली. मग आनंदनं केसपेपरवर बऱ्याच ओळी असलेला शिक्का मारला. मी तो बघू लागलो. आनंद म्हणाला, ' ट्रीटमेंटचं प्रिस्क्रिप्शन आहे. दरवेळी लिहायला नको. त्यातली नको ती ड्रग्ज खोडून टाकता येतात. हा दुसराही शिक्का बघ. फॉलोअप ट्रीटमेंटसाठी. मंगळवारी सी. जी. एस. हॉलमध्ये सकाळी साडेनऊला आणि शुक्रवारी संध्याकाळी साडेसहाला . . . असं सगळं मग गर्दीच्या वेळी लिहीत बसायला लागत नाही.

' हॉस्पिटलनं करून दिले हे शिक्के ? '

' छेः छेः माझ्या खर्चानं. '

तिथं उभ्या असलेल्या पॉश कपड्यांतला मध्यमवयीन माणसाला आनंद म्हणाला, ' रमेश, प्लीज यांना खाली जाऊन कसं ॲडमिट करायचं ते दाखवून दे. ' तो माणूस तत्परतेने यांना घेऊन गेला. मी विचारलं. ' हा रमेश कोण आहे ? '

' रिकव्हर्ड अल्कोहोलीक आहे. हे ए. ए. (अल्कोहोलिक ॲनॉनिमस) वाले लोक मला फार मदत करतात. पेशंटना आणतात. ॲडमिट करतात. थांबतात. अगदी पडेल ते काम करतात. '

आधीच्याच मुलासारखा दिसणारा त्याच वयाचा दुसरा पोरगा पुढं येऊन बसला. हा पूर्वी मुंबई महापालिकेत सफाई कामगार होता. ते काम बदली कामगार म्हणून होतं. ते गेल्यावर तो जुगाराच्या अड्ड्यावर काम करायला लागला. चक्र फिरवायचं, लोकं आकडे लावायचे. दिवस- रात्र बसून राहायचं काम होतं. कंटाळा यायचा. मालक म्हणाला, ' ही पावडर ओढून बघ. एकदम सुम्म वाटतं. कंटाळा येणार नाही. ' म्हणून मग हा घ्यायला लागला. आधी चरस अधून मधून ओढायचा. पण ही पावडर ओढायला लागल्यावर थोड्याच दिवसांत त्यात तो अडकला. त्या अड्ड्यावरच्या कामात पैसे चांगले मिळायचे. पण ते सगळे या गर्दमध्ये जायला लागले. मग भागेना तेव्हा जुगार खेळायला येणाऱ्यांना यानं ते व्यसन लावलं. आता सगळेच पावडरवाले झाले. मग मालकाने याला हाकलून लावलंय.

आनंद मला म्हणाला, ' समाजातली फ्रिंजवरची पोरं, अंडरवर्ल्डमध्ये वावरणारी छोटी मोठी कामं करणारी पोरं . . . ही अशा नवीन येणाऱ्या व्यसनाला फार लवकर बळी पडतात. कारण ऑलरेडी ते चरस, गांजा ओढत असले तर गर्दच्या एका सिगारेटनंसुद्धा ते त्यात कायमचे अडकतात. '

मी त्या मुलाला विचारलं, ' मग आता तुला इथं यावसं का वाटलं ? '

' आता अगदी मरायची पाळी आली. पहिल्यांदा तब्येत सॉलिड होती.

आता बघा कशी झालीय.' त्यानं शर्टची पुढची बटनं काढून छाती दाखवली. हाडं दिसत होती. दोन बरगड्यांमध्ये अक्षरशः पन्हाळ्या झाल्या होत्या.

तो म्हणाला, ' पावडरचा नाद लागायच्या आधी माझं वजन बासष्ट किलो होतं. सहा महिन्यांत ते एकूणचाळीस किलो झालं.'

मी आश्चर्यानं म्हटलं, ' वजन डिटेल कसं तुला माहीत ?'

' पूर्वी दर महिन्याला स्टेशनवरच्या ठरलेल्या काट्यावर करायचो. पण एकूणचाळीस किलोचं कार्ड पाहिल्यावर वजन करायचं सोडून दिलं.'

मी त्याला म्हटलं, ' येवढं वजन का उतरलं ?'

तो म्हणाला, ' चरस घेत होतो तेव्हा उलट सडकून भूक लागायची. चरस तब्येतीला फार चांगला. पण गर्दमुळे भूक लागायची नाही. पहिल्या पहिल्यांदा तर संडासच बंद झाली होती.'

मनात आलं, बरोबर. कारण हेरॉईन हा अफूचा प्रॉडक्ट. अफूमुळं कॉन्स्टिपेशन होतंच.

पुढं तो म्हणाला, ' खाण्याची शुद्ध नसायची. उठल्यापासून एकच काळजी, आज पावडर कशी मिळवायची ! सकाळी उठलो की काही सुचतच नाही. अंग मरगळून जातं. उठून तोंड धुवायचीसुद्धा ताकद नसते. संडासला जावंसं वाटत नाही. पडल्या पडल्या इकडला हात तिकडे हलवावा वाटत नाही. आदल्या दिवशीच्या स्टॉकमधनं एक सिगरेट पावडर भरून ठेवतो. ती उशीखालीच असते. उठून ती एकदा ओढली की, मग किल्ली दिल्यासारखं चालू होतं. अंथरूण झटकून टाकून तोंड धुतो. चहा घेऊन बाहेर. बाहेर पडल्यावर तोच विचार, आज पैसे कसे उभे करायचे, पावडर कशी मिळवायची ? पैसे मिळवायसाठी काय काय केलंय ते माझं मलाच माहीत. डॉक्टर, आता मला यातनं सोडवा. ॲडमिट करा. कितीही त्रास होऊ द्या, मी सहन करीन. '

त्याच्यानंतर स्टुलावर एक उंच, शेलाटा, सावळ्या रंगाचा तरुण येऊन बसला. केस वाढलेले, कसेतरी विंचरलेले होते. दाढीचे खुंट वाढलेले होते. अंगात ग्रे रंगाचा सिल्कसारखा चमचमणारा पण खूप मळलेला शर्ट पँटमध्ये इन केलेला होता. बसताना पुढे पोक काढून बसला होता. त्याच्याबरोबर स्वच्छ चेहऱ्याचा, चांगल्या कपड्यांतला, हसतमुख माणूस उभा होता. आनंद त्या माणसाकडे बोट दाखवून म्हणाला, ' हा गणेश, आमचा चांगला सोशल वर्कर आहे. '

मी विचारलं, ' ए. ए.वाले का ? '

आनंद म्हणाला, ' नाही, नाही. हा आमचा बरा झालेला सायकियाट्री पेशंट आहे. '



गणेशनं बरोबर आणलेल्या माणसाचं नाव होतं सिद्ध. हा धंद्यानं शिंपी. त्याच्या भावांची मिळून ३/४ शिंप्यांची दुकानं आहेत. हा पैसे भरपूर मिळवायचा. त्यामुळे व्यसन झपाट्यानं वाढत गेलं.

सिद्धला विचारलं, ' तुम्ही गर्द सिगरेटमधनं घ्यायचा की कशी ? '

तो म्हणाला, ' मला शिकवलं एकानं ते चेसिंग. त्यामुळे आधी सिगरेटमधनं आणि नंतर चेसिंग असा प्रकार झालाच नाही. डायरेक्ट चेसिंग. '

चेसिंगविषयी ऐकलं होतं, पण ते तपशिलाने कळावं म्हणून विचारलं, ' चेसिंग कसं करता ते सांगा बरं जरा. '

तो म्हणाला, ' सिगरेटची चांदी घ्यायची. त्याच्यावर मधे पावडर एका लायनीत टाकून ठेवायची. चांदीला खालून काड्यापेटीतली काडी जाळून उष्णता द्यायची. निवांत चेसिंग करायचं असलं तर मेणबत्ती पेटवून तिच्यावर नी चांदी धरायची. आधी पावडर वितळते. मग धूर निघायला लागतो. त्याच वेळी तोंडात पितळी नळी धरायची आणि तो धूर ओढून घ्यायचा, की झालं चेसिंग. सिगरेटमधनं जे घेतात ते बिगर फिल्टर सिगरेट घेतात. त्या सिगरेटमधली निम्मी तंबाखू काढतात. त्यात पावडर मिसळतात. परत ती सिगरेटमध्ये भरतात. थुंकीनं पुढची बाजू जरा भिजवून दाबतात. म्हणजे सिगरेट हळूहळू जळते. पण यात काय होतं, तंबाखूच्या धुरामुळे पावडरचा धूर डायल्यूट होऊन आत जातो. म्हणून जो चेसिंग करायला लागला त्याला सिगरेटमधनं पावडर घ्यावीशी वाटत नाही. '

असं म्हणून त्यानं खिशातनं पितळी काळी पडलेली नळी काढून दाखवली. तो म्हणाला, ' नळी नसली तर साधी रुपयाची नोट घेऊन नळी करतो. त्यानं पण ओढता येतं. '

गणेश म्हणाला, ' ते नाणं धरतात ते नाही सांगितलं ! ' सिद्ध म्हणाला, ' नळीतनं धूर डायरेक्ट आत गेला तर दात काळे पडतात, तोंडाला त्रास होतो. म्हणून दातापुढं पाच पैशांचं नाणं धरतात. त्याला पुढं नळी लावतात. म्हणजे धूर ओढला तर या नाण्यावर येतो. त्याचा दाह इतका असतो की ते नाणं पण काळं पडतं. आम्ही ते नाणंपण खरडतो आणि तो चुरा परत चांदीवर टाकून तो ओढतो. येवढंच काय, नळीच्या आतला भाग सुद्धा खरवडला तर जो चुरा निघतो तो पण चांदीवर टाकतो. '

मी म्हटलं, ' पण ती घाण असणार. त्यातनं काय मिळतं ? '

सिद्ध म्हणाला, ' अहो, तो तर प्युअर माल. कारण ब्राऊन शुगरमध्ये काय काय असतं ते जळून गेलेलं असतं. हा चुरा म्हणजे कन्डेन्स झालेलं हेरॉइन असतं . . . '

मी विचारलं, 'असं चेसिंग किती वेळा करायचा? दिवसातनं किती लागायची पावडर?'

'त्याला सुमार नाही. दोन वर्षांपूर्वी गर्द बरीच स्वस्त होती. रोजच्या रोज आणायपेक्षा दोनशे रुपयांना मोठं पॅकेट आणायचो. ते दोन दिवस पुरवायचो. कधी दीड दिवसात संपायचं.'

'कधी पावडर मिळाली नाही असं झालंय का?'

'नाही. काहीही करून मिळवतोच. छापे पडले, टंचाई असली तरी. मी गेलो आणि काही गडबड असली तरी तिथला माणूस मला खूण करायचा. बाजूच्या रस्त्यावर आम्ही भेटायचो. तिथल्या लोकांना माहीत होतं की मी मोठं गिऱ्हाईक आहे. नेहमीचं आहे. तोडून चालायचं नाही. काहीही करून द्यायचेच. फक्त एकदा खराब माल निघाला होता. तीनशे रुपये देऊन पुडी घेतली. चेसिंग करायला गेलो तर वास इतका खराब, परत त्यात नशा नाही. सगळी पुडी फेकून दिली. त्या पोराला दोन कानफटात लावल्या. दुसरं काय करणार?'

'किती वेळानं घेता?'

गणेश म्हणाला, 'अहो, सारखं याचं हेच चाललेलं असतं. याची आई म्हातारी, अडाणी आहे. यांची भाषा तेलगू. भावांनी पैसे नाही दिले तरी म्हातारी याला पैसे देते. आमच्या समोरच राहतात. माझ्याकडे येऊन सारखी रडते, काही करून याला सोडवा.'

सिद्ध म्हणाला, 'दर पंधरा–वीस मिनिटांनी चेस करावंच लागतं. पिक्चरला मी तीन तास एका जागी बसूच शकत नाही. दर पंधरा मिनिटांनी बाहेर येऊन चेस करून परत जागी जाऊन बसतो. सुरुवातीच्या काळात लोकांना ही नशा माहीत नव्हती ना, तेव्हा इंटरव्हलला मी चेस करत असलो तर भोवती लोक पाहायला जमायचे. माहिती विचारायचे. तेव्हा मला काय रुबाब वाटायचा. पण त्यानंच पुढं वाटोळं झालं.'

"तुम्ही पंधरा मिनिटं एका जागी राहू शकत नाही तर दुकानात काम कसं करता?"

दुकानात गेले महिनाभर जायचं सोडून दिलंय. ही दाढी बघा किती वाढलीय. पूर्वी काय स्मार्ट राहायचो. एकाचढ एकेक पॉश कपडे होते मला. अगा शौकीन होतो की दिवसातनं दोनदा ड्रेस बदलायचो. आता अंगावरचा हा शर्ट आहे ना, हा आठ दिवसात अंगावरनं काढलाच नाही. अशा अवतारात दुकानात कसा जाणार? तिथं गिऱ्हाइकांशी बोलायचं असतं. त्यांना खूष ठेवायचं असतं. मला तर शेवटी शेवटी असं झालं होतं की गिऱ्हाईक काय बोलतंय ते मला कळत



नव्हतं, आणि मी काय बोलतोय ते त्यांना कळत नव्हतं.'

'यातनं कधी बाहेर पडायचा प्रयत्न केलात का?'

गणेश म्हणाला, 'अहो, त्याच्यासाठी सुद्धा यानं पाण्यासारखा पैसा खर्च केलाय, कुठं कुठं ॲडमिट झालाय. पण परत घ्यायला लागला.'

सिद्ध हा मुंबईतल्या एका तरुण, एम. बी. बी. एस. डॉक्टरकडे ॲडमिट झाला होता. डॉक्टर ड्रग ॲडिक्ट्स्‌मधे प्रसिद्ध आहेत. सिद्धला त्यानं त्याच्या फ्लॅटवरच ठेवलं होतं. एक स्वतंत्र बेडरूमच त्याला दिली होती. चार दिवस त्याने भरपूर सिडेटिव्हज्‌ची इंजेक्शनं देऊन झोपवून ठेवलं होतं. सहा दिवसांनी त्याला घरी पाठवलं. सहा दिवसांचं बिल त्या डॉक्टरनं सहा हजार रुपये घेतलं.

आनंदने त्याला विचारले,'पण आता नक्की सोडायचीय ना?'

तो नमस्कार करून म्हणाला, 'अगदी नक्की सोडायचीय.'

आनंदने शिक्के मारून केसपेपर्स गणेशकडे दिले.

पुढे एक बुटका गोरा मुलगा येऊन बसला. आनंद मला म्हणाला, 'हा आमचा बरा झालेला पेशंट बरं का.' त्यानं हसून मला नमस्कार केला. हा होजिअरीचा धंदा करणारा गुजराथी मुलगा होता.

आनंदनं त्याला विचारलं, 'काय प्रदीप, कसं काय?'

'ठीक आहे.'

'परत घ्यावीशी वाटते का कधी?'

कानाला हात लावून म्हणाला, 'छेः छेः पण डॉक्टर अजून झोप येत नाही. डोकं दुखतं.'

'मी तुला आधीच सांगितलं होतं ना, की शरीरात हे सगळं विष खेळत होतं. ते बंद केलं असलं तरी शरीरातनं सगळं निघून जायला वेळ लागतो. त्याच्यामुळे हा त्रास काही महिने होणार. आतापर्यंत घेत होतास तेव्हा काय कमी त्रास होत होता का? त्या मानानं हा कमीच नाही का? त्रास कमी व्हावा म्हणून प्रयत्न करू. पण तरी थोडा होणारच . . .

प्रदीप मान डोलवत होता.

तो म्हणाला, 'साहेब, धंद्यात फार त्रास होतो. गर्दमुळे माझी बदनामी फार झालीय. मी गर्द सोडलीय असं जीव तोडून सांगितलं तरी लोकांचा विश्वास बसत नाही. माझे धंद्यातले कॉम्पिटिटर याचा फायदा घेऊन खोटा प्रचार करतात. फार निराशा येते अशा वेळी.'

'पण निराशा आली तरी गर्दकडे परत वळणार नाहीस ना?'

'छेः छेः गर्दचं नाव काढू नका.'

' सुरुवातीला विश्वास वाटेपर्यंत असं होणारच. तू नेटानं प्रयत्न चालू ठेव. घडी बसायला उशीर लागला तरी हरकत नाही. आई तुला जेवायला घालते ना ? काळजी करायची नाही. '

तो नमस्कार करून गेला; आणि काही मिनिटांतच एक मध्यमवयीन, जरा स्थूल, गुजराथी पद्धतीची पांढरी, काठाची साडी नेसलेली बाई येऊन बसली. आनंदला म्हणाली, ' प्रदीप आला होता का ? '

' हो. आत्ताच गेला. '

' डॉक्टरसाहेब, तो घरी फार त्रास देतो. साध्या गोष्टीवरून चिडतो. बाहेरून आला की मला काळजी वाटते की हा घेऊन आलाय की काय. मग तसं विचारलं तर काय चुकलं ? '

हीच गोष्ट ती परत परत सांगत होती. शेवटी ती गेल्यावर आनंद म्हणाला, ' अशी नॅगिंग करणारी आई असली तर तो यामुळेसुद्धा एखाद्यावेळी परत रिलॅप्स व्हायचा. प्रदीप जिथं जिथं जाईल तिथं तिथं ही बाई जाते. त्यामुळे तो वैतागतो. आता दर सोमवारी मला हा इथं भेटायला येतो. त्याच्या मागोमाग ही येतेच. '

मी म्हटलं, ' म्हणजे आईलाही ट्रीटमेंटची जरुरी आहे. '

आनंद हसून म्हणाला, ' हो. अगदी खरंय. '

फॉलोअपसाठी एक सफारी सूटमधला, स्मार्ट चेहऱ्याचा माणूस येऊन बसला. आनंद मला म्हणाला, ' हा मिनिस्टरचा ड्रायव्हर होता बरं का आता जवळपास वर्षभर हा बरा आहे. '

मी विचारलं, ' हो ? कुठल्या ? '

त्यानं नाव सांगितलं.

मी विचारलं, ' हे व्यसन कसं लागलं ? '

' मंत्र्याचा मुलामुळं. मला गाडी घरी मुक्कामाला घेऊन जायची परवानगी साहेबांनी दिलेली होती. पण हा पोरगा म्हणायचा, संध्याकाळी माझ्याकडे गाडीची किल्ली दे. पेट्रोलची टाकी फुल करून. सकाळी मी परत देईन. मला ते पटायचं नाही. मी द्यायचो नाही. मग त्यानं चाल बदलून दोस्ती केली. मला सिगारेट द्यायचा. मला आधी हे माहीत नव्हतं. इतकी सवय लागली की संध्याकाळी त्या सिगारेटसाठी मी त्याची हातात किल्ल्या घेऊन वाट पहायचो. त्यानं कुठंतरी ॲक्सिडंट केला ते सगळं माझ्यावर आलं. आणि मला नोकरीतनं निलंबित केलं. मग पुढं तर आणखीच हाल. व्यसन वाढलं, आणि नोकरी सुटलेली. माझ्यावर सगळं कुटुंब अवलंबून. मी खेड्यातून येऊन खूप कष्टानं सगळं उभं केलं होतं. '

' मंत्र्याच्या मुलाला हे व्यसन होतं का ? '



' हो. मग त्याच्या वडलांनी ट्रीटमेंटसाठी फॉरेनला पाठवलं. अजून तिकडंच आहे तो. मी ट्रीटमेंटला इकडं आलो. '

' तुम्ही कसे बाहेर पडलात ? '

त्याने बरोबर आलेल्या तेरा–चौदा वर्षाच्या मुलाकडे बोट दाखवलं. तो म्हणाला, ' याच्यामुळे. हा धाकटा भाऊ. हा माझ्या सावलीसारखा बरोबर राहिला. म्हणूनच मी बाहेर पडू शकलो. '

ओ. पी. डी.ची वेळ संपत आली होती. मी व आनंद कँटिनच्या दिशेने सुटलो.

° ° °

# २

के. ई. एम्. हॉस्पिटलमधल्या वॉर्डमधे दुपारची चक्कर मारली. सकाळी ॲडमिट झालेली तीन मुलं बाकड्यावर बसली होती. परीक्षेला निघालेल्या मुलांसारखे त्यांचे चेहरे झाले होते. आम्हाला पाहताच त्यातला एकजण म्हणाला, ' डॉक्टरसाब, जादा तकलीफ तो नहीं होगी ? ' आनंदने मान हलवली.

आधी ॲडमिट होऊन बरे होत आलेली दोन–तीन मुलं शेजारीच बसली होती. त्यातला बंडू नावाचा चुणचुणीत मुलगा त्या मुलाच्या छातीवर थाप टाकून म्हणाला, ' दिल पक्का रख, कुछ होगा नहीं. '

आत गेलो. गणेश उभा होता. आनंदने विचारलं, ' कुठाय सिद्ध ? '

' आत संडासला गेलाय, येईलच. '

दहा- पंधरा मिनिटांनी तो आला. आनंदनं विचारलं. ' कसं काय ? '

' आताच संडासात जाऊन शेवटची पुडी ओढून आलो. आता बास. '

आम्ही चाट झालो. आनंद म्हणाला, ' वॉर्डमध्ये असं परत कधी करायचं नाही. '

तो सावकाश कॉटवर जाऊन भिंतीला टेकून बसला. त्याचे डोळे जडावले होते. समोर पाहात असताना पेंगल्यासारखी त्याची मान खाली गेली आणि तसाच तो निश्चल बसून राहिला.

पलीकडच्या खोलीत गेलो. एकेका खोलीत चार- चार कॉट्स् होत्या. एका कॉटवरच्या तरुण मुलाला चांगलीच टर्की आलेली दिसत होती. चेहरा फुललेला होता. अंग घामानं भिजलेलं होतं. तो मधून उठायचा. काहीतरी तोंडातल्या तोंडात बडबडायचा. हातानं सिगारेट वळल्याची ॲक्शन करायचा. बोट तोंडाशी लावायचा आणि मिनिटा- मिनिटानं थुंकायचा. जमिनीवर, गादीवर कुठेही. मला अगदी किळस आली. पण इतर पेशंटना, नातेवाइकांना त्याचं फारसं काही वाटत नव्हतं. त्या मुलाचा बाप म्हणाला, ' या मुलावर आतापर्यंत दहा हजार रुपये खर्च केलेत. पण तरी हा परत पावडरकडे जातोच. आता आशेनं इथं घेऊन आलोय. '

तो मुलगा हो, हो, हो, करीत इकडं तिकडं धावू लागला. बाप त्याला ओढून परत कॉटवर बसवू लागला. आनंद म्हणाला, ' सिस्टरना मी सांगतो याला इंजक्शन द्यायला. '

खालच्या मजल्यावर आलो.

आनंद म्हणाला, ‘ माझ्या रूमवर थोडा वेळ विश्रांती घेऊ. संध्याकाळी प्रभाकर नावाचा पेशंट येणार आहे भेटायला. तो रिकव्हर्ड ॲडिक्ट आहे. शुक्रवारची नारकॉटिक ॲनॉनिमसची मीटिंग तोच घेतो. चांगला बोलका आहे. तू बोल त्याच्याशी. ’

० ० ०

के. ई. एम.च्या मुख्य इमारतीकडून दुसऱ्या इमारतीतल्या वॉर्डांमध्ये निघालो होतो. वॉर्डांमध्ये पेशंटना भेटायला येणाऱ्यांची संध्याकाळची गर्दी ओसरत चाललेली होती. बाहेरच्या कठड्यांवर, पॅसेजमध्ये ठेवलेल्या बाकड्यांवर बसून पेशंट्स् गप्पा मारीत होते. झिजलेल्या फरशा, गुळगुळीत कठडे पाहून सगळं कसं वर्षानुवर्षं रुळलेलं वाटत होतं.

एकोणीस नंबरच्या वॉर्डात खालच्या मजल्यावर सायकियाट्री डिपार्टमेंट आहे. डिपार्टमेंट म्हणजे दोन–तीन खोल्या, त्यात टेबल–खुर्च्या आणि काही स्टीलची कपाटं. संध्याकाळ असल्यानं तिथं सगळी सामसूम होती. दिवे लावून दोन खुर्च्यांमधे मी व आनंद बसून गप्पा मारत प्रभाकरची वाट पाहू लागलो.

ठरलेल्या वेळी प्रभाकर आलाच. तो तिशीचा, सावळा, जाडजूड तरुण होता. चेहरा गोलसर आणि स्मार्ट होता. मिश्यांची बारीक पट्टी होती. अंगात निळ्या आणि लाल रंगांचं भडक कॉम्बिनेशन असलेला टी शर्ट घातलेला होता. समोरच्या खुर्चीत तो बसला. आमचं चाललं होतं ते बोलणं संपल्यावर आनंदनं माझी ओळख करून दिली व म्हणाला, ‘ तुझी पहिल्यापासूनची हकीगत सांग यांना. ’

मी म्हटलं, ‘ अगदी बारीकसारीक तपशीलसुद्धा सांगा. मला भरपूर वेळ आहे. ’

प्रभाकर सांगू लागला, ‘ मी नेव्हल डॉकमध्ये कामाला होतो. आधी अप्रेंटिस म्हणून. तिथं वरच्या पोस्टला सिलेक्ट झालो. पगार चांगला मिळू लागला. तिथं आमचा ग्रूप जमला. खूप एंजॉय करायचो. कुणीतरी आम्हाला चरस इन्ट्रोड्यूस केला. काडीवर चरसची गोळी थापून बसवायची. दुसरी काडी पेटवून ती गरम करायची. तो कडक झाला की तंबाखूत मळून सिगरेटमधनं ओढायचो. कधी चिलमीतनं. मोठी मजा यायची. नंतर कुणीतरी ब्राऊन शुगर आणली. मग दोन्ही घेऊ लागलो. मुंबईत चरस आणि ब्राऊन शुगरला ‘ राम और श्याम ’ म्हणतात. ’



आनंद म्हणाला, ‘ तुमच्या पुण्याला चरसला केशर आणि ब्राऊन शुगरला कस्तुरी म्हणतात. ’

मी म्हणालो, ‘ बघा, आहे की नाही आमचं पुणं जास्त सुसंस्कृत. ’

सगळे हसलो.

प्रभाकर म्हणाला, ‘ पण आम्ही राम और श्याम खरोखरच एंजॉय केलं. स्टॉक घेऊन आम्ही सगळे दोस्त कर्नाळ्याच्या अभयारण्यात जायचो. रात्री शेकोटी करून दम मारायचो. सकाळी दम मारून अरण्यात हिंडायचो. झाडं, जंगल पाहताना मस्त वाटायचं. वर्ष–दीड वर्ष असं मस्त एंजॉय केलं. पुढं चरस सुटला आणि ब्राऊन शुगर वाढत गेली. ऑफिसच्या कामावर मी परिणाम होऊ दिला नव्हता. पण खर्च वाढत चालला. सगळा पगार याच्यातच जायला लागला. चारी भाऊ मिळवते होते. त्यामुळे मला घरी पैसे द्यावे लागत नव्हते. पण एके दिवशी माझ्या शर्टात गर्दची रिकामी बाटली सापडली. त्यामुळे घरी कळलं. पण मी सांगितलं, ‘ माझा मित्र हे घेतो. त्यानं घेऊ नये म्हणून मी त्याच्या खिशातनं काढून घेतली ती ही माझ्या खिशात राहिलीय ’ असं सांगून वेळ मारून नेली. पण त्यानंतर माझ्यावर सगळे लक्ष ठेवू लागले. मी कामावर दांड्या मारू लागलो. पुढे पुढे तर फक्त पगाराच्या दिवशी जाऊन मिळेल तेवढा पगार घेऊन त्याची नशा करू लागलो. भावांनी मला एकदा खोलीत कोंडून खूप बदडलं. माझे भाऊ म्हणजे एकेक सॉलिड आहेत. पण संधी मिळाली की मी परत जायचो. ’

‘ गर्द कुठून आणायचा ? ’

‘ भेंडीबाजारमधून. जेव्हा पैसे होते तेव्हा तिथं जाऊन चेसिंग करून यायचो. तिथं आत एक हॉल आहे. खास गिऱ्हाइकांना तिथे सोडायचे. आत वातावरण अगदी पॉश. खाली गालीचे त्यावर अष्टकोनी आकाराची टेबलं होती. त्याला छोटी ड्रॉवर्स होती. त्यांत सिगरेटच्या चांद्या, मॅच बॉक्सेस, मेणबत्त्या ठेवलेल्या असायच्या. वेटरसारखे तिथले लोक ब्राऊन शुगर ‘ सर्व्ह ’ करायचे. मग मेणबत्ती पेटवून निवांत चेसिंग करीत बसायचो. नंतर मग पैसे कमी पडू लागले तसा रस्त्यावर मिळणारा माल घेऊ लागलो. माझं व्यसन सुटावं म्हणून आईनं उपास केले. मी सगळ्यात धाकटा म्हणून आईनं माझे खूप लाड केले. चारी भाऊ चांगले मिळवते, घर घेतलं. तिला वाटलं होतं, आता आपले म्हातारपण निवांत घालवू. पण तेवढ्यात माझं हे व्यसन सुरू झालं. भाऊ, वहिन्या सगळ्यांना त्रास व्हायला लागला तसं मी घर सोडलं. एका बागेत राहायला लागलो. या व्यसनापायी इतका बेजार झालो की, ठरवलं शिर्डीला जाऊन साईबाबांसमोर हे व्यसन सोडायचं. ’

' तुम्ही त्यापूर्वी व्यसन सोडायचा प्रयत्न केला होता का ? '

' मीहून नाही. पण भावांनी मला जे. जे. हॉस्पिटलमध्ये नेऊन टाकलं होतं. तिथं दारू सोडणारे, गर्द सोडणारे लोक ॲडमिट केले होते. तिथं शहाळ्यातनं दारू आणून पेशंट आरामात स्ट्रॉने पित बसायचे. गर्दवाल्यांना वॉर्डबॉय पुड्या आणून पुरवायचे. '

मला हसूच आलं. आनंदला म्हणालो, ' तुमच्याही वॉर्डात असं होत नसेल कशावरून ? '

आनंद म्हणाला, ' सुरुवातीला शक्य होतं. पण आता आमच्या रिकव्हर्ड पेशंट्सचा चांगला ग्रूप तयार झालाय. ते लक्ष ठेवतात आणि मला बरोबर इन्फर्मेशन देतात. आणि प्युपिलवरनं लगेच ओळखू येतं घेतलीय का नाही ते. '

मी म्हटलं, ' बरं, ते शिर्डीचं तुम्ही सांगत होतात. '

' हां. माझी पहिल्यापासून साईबाबांवर फार श्रद्धा. तेव्हा वाटलं, माझं व्यसन सुटायचं असेल तर ते एक साईबाबा सोडवू शकतील. शिर्डीला जाऊन सुटलं तर ठीक, नाही तर गर्द पिऊन पिऊन एका दिवसात मरायचं. ऑफिसात असताना इमर्जन्सी म्हणून एका बँकेत आठशे रुपये ठेवले होते, ते काढले. साईबाबांना चढवायला अडीचशे रुपयांची शाल घेतली. शिर्डीला गेलो. धर्मशाळेतली एक खोली घेतली. ठरवून गेलो होतो कितीही त्रास झाला तरी डॉक्टरकडे जायचं नाही. सकाळी साईबाबांना अभिषेक केला, शाल चढवली आणि निवांत फिरून आलो. संध्याकाळपर्यंत काही वाटलं नाही. नंतर अस्वस्थ वाटायला लागलं. खोलीत जाऊन बसून राहिलो. रात्री पोटात दुखायला लागलं. कळा येवढ्या जोरजोरात येऊ लागल्या की कुणीतरी शरीर पिळवटून काढतोय असं वाटलं. मी गुरासारखा ओरडू लागलो. मॅनेजर धावत आले. त्यांना म्हटलं, मला डॉक्टरकडे न्या. त्यांनी रात्री डॉक्टरला उठवलं. मला गोळ्या, इंजेक्शन दिलं. त्यामुळे कमी व्हायच्या ऐवजी वाढतच गेलं. भडाभडा उलटया व्हायला लागल्या. उलटीचा जोर भयंकरच. एरवी आपण बेसिनमध्ये जाऊन उलटी करतो, तशी ही नसते. तिच्यात इतका फोर्स होता की समोरच्या भिंतीवर जाऊन पडायची. अक्षरशः जमिनीला समांतर जायची. एकेका उलटी बरोबर प्राण जाणार, वाटायचं. परत मॅनेजरनं डॉक्टरला आणलं. परत इंजेक्शनं. परत त्रास वाढला. नंतर बेडमधे जुलाब सुरू झाले. त्यातनं येणाऱ्या रक्तानं सगळ्या चादरी भरून गेल्या. खोलीभर उलटया, जुलाब. त्यात मी तळमळत पडलेलो. मॅनेजर घाबरून उभा. यात किती वेळ गेला याची मला शुद्ध नव्हती. मी त्याला म्हटलं तुम्ही असं करा, मुंबईत जाणाऱ्या गाडीत बसवा. त्याला ते पटलं. त्यानं,



मला अक्षरशः उचललं, आणि मुंबईला जाणाऱ्या कुठल्यातरी अपरात्रीच्या एस. टी.त आणून टाकलं. सकाळी मुंबई आली केव्हा, समजलं नाही. डोक्यात घण पडत होते. मळमळत होतं. एस. टी. तल्या माझ्या सीटखाली सगळं रक्त झालं होतं. कंडक्टरनं मला उचलून स्टँडबाहेर आणलं आणि एका टॅक्सीत टाकलं. मी त्या टॅक्सीवाल्याला सांगितलं, भेंडीबाजार. तिथं नेहमीच्या ठिकाणी टॅक्सी थांबवली. एका पोराला खूण करून गर्द आणायला सांगितलं. त्यानं आणलेल्या दोन बाटल्या सिगरेटमधे घाईघाईनं भरल्या आणि टॅक्सीत ओढू लागलो. काय सांगू डॉक्टर, दोन मिनिटात मी खडखडीत बरा झालो. उलटया पळाल्या, जुलाब पळाले, डोकं दुखणं पळालं. एकदम बरं वाटू लागलं. परत सगळं व्यसन सुरू झालं. '

आनंदही लक्षपूर्वक ऐकत होता. मला वाटलं होतं, हे त्यानं आधी ऐकलेलं असणार. पण कदाचित इतकं डिटेलवार ऐकलं नसेल.

मी विचारलं, ' मग सुटलं कसं हे व्यसन शेवटी ? '

' नंतर मग परत मला घरी आणलं. परत घरात राहवेना तसं मी घर सोडून जायची भाषा करायला लागलो. तशी आई म्हणाली, 'यावेळी तू घरातनं बाहेर पडलास तर तुझ्याबरोबर मीही बाहेर पडणार.' शेवटी मी एकदा बाहेर पडलो आणि हातात चाकू घेऊन उभा राहिलो. म्हणालो, कुणी माझ्या मागे आलात तर चाकू मारीन. भाऊ बाहेर पडणार होता, पण तो घाबरून बाहेर आला नाही. तरीही आईनं पुढे पाऊल टाकलं. त्याबरोबर मी अशा काही फोर्सनं चाकू फिरवला की माझं मलाच आश्चर्य वाटलं. भावानं आईला मागे खेचून घेतलं म्हणून तिला चाकू लागला नाही. मग माझ्या मागे कोणी आलं नाही. पुढं मी बागेत, फूटपाथवर झोपायचो. काही करून पैसे मिळवून व्यसन करायचो. अंगावरचे कपडे विकले. नंतर मला घरच्यांनी उचलून परत जे. जे. ला ॲडमिट केलं. मला ॲडमिट होतानाचं अंधूक आठवतंय. पण नंतरचं काहीच नाही. एकदम घरी आल्यावरचंच आठवतं. थकवा खूप आला होता. कसे तरी दिवस ढकलत होतो. जरा तब्येत बरी झाली की परत घर सोडायचं ठरवत होतो. तेवढ्यात मला आईनं विचारलं, ते एक गृहस्थ भेटायला आले आहेत त्यांना भेटणार का ? मी कशाला म्हणालो. ते ए. ए. चे (अल्कोहोलिक ॲनॉनिमसचे) मेंबर होते. ते म्हणाले, ' तुझ्यासारखाच मीही व्यसनी होतो. पण पांगळ्याचे दुःख पांगळाच समजू शकतो. ' हे वाक्य माझ्या मनावर ठसलं. मग ते नेहमी येऊ लागले. एकदा ते मीटिंगला घेऊन गेले. तिथं अनेकजण भाषणात आपण व्यसनापायी काय काय कृत्यं केली त्यांची मोकळेपणानं कबुली देत होते. मला

फारच आश्चर्य वाटलं. असल्या केलेल्या गोष्टी मी मनात सुद्धा वर येऊ देत नाही, ते ही माणसं बोलू कशी शकतात? माझी सगळ्यांनी आपुलकीनं चौकशी केली. मी व्यसनातनं बाहेर पडावं म्हणून ते रोज प्रार्थना करायचे. आतापर्यंत एकतर सगळ्यांनी हिडीसफिडीस केलं होतं. ज्यांचं प्रेम आहे अशांनी उपदेशाचे डोस पाजले होते. ए. ए. वाले मित्र मला खूप आवडले. हळूहळू मला उत्साह वाटू लागला. मी पुस्तकांचं शेल्फ आवरलं. घरात पडून असायचो तो घरात फिरू लागलो. आई सिंकमध्ये भांडी घासत असली तर तिला भांडी विसळून देऊ लागलो. '

' आईला फारच बरं वाटलं असेल. . . '

' तिला तर वाटलं, आपल्याला गेलेला मुलगा परत मिळाला. काही दिवस विश्रांती घेऊन परत कामावर जायचं ठरवलं. तिथल्या लोकांनी माझी जागा परत देऊ केली. ज्या दिवशी कामावर गेलो तो दिवस तर मला आज जसाच्या तसा आठवतोय. कामावर गेलो. तिथं गेटसमोर उभा राहिलो. गेटच्या शेजारी दुसरा रस्ता आहे, तिथून पुढे गेलं की एका माणसापाशी गर्द मिळते. यापूर्वी एकदा स्वतः होऊन मी व्यसन सोडून परत कामावर रुजू व्हायला आलो आणि ऑफिसच्या गेटमध्ये शिरायच्या ऐवजी गर्दच्या गेटमध्ये गेलो आणि परत व्यसनात अडकलो होतो. आता परत तोच क्षण आला होता. माझे पाय थांबले होते. कुठल्या रस्त्यानं जायचं. ऑफिसच्या की मरणाच्या? मी काहीच ठरवू शकत नव्हतो. पायाला मुंग्या येत चालल्या होत्या. त्यानंतरचं मला काही आठवत नाही. माझे पाय कसे ऑफिसच्या दिशेनं वळले, मी कधी कार्ड पंच करून घेतलं, कधी आत आलो, काही कळलंच नाही. माझ्या नेहमीच्या जागी आल्यावर पंख्याचा वारा लागला तसा मी शुद्धीवर आलो. '

' काय विलक्षण, नाही? '

' मी कसा इकडे आलो, कोणी आणलं हे मला अजून कळतच नाही. मला वाटतं, माझ्या ए. ए.च्या मित्रांनी माझ्यासाठी ज्या प्रार्थना केल्या होत्या, त्यामुळेच मी इकडे खेचला गेलो. '

बोलताना त्याचा आवाज खुंटत होता. त्यावर काही बोलायचं म्हटलं तर माझाही आवाज उमटत नव्हता. बाहेर सगळीकडे अंधार पसरला होता. वर पंख्याचा गुं गुं आवाज तेवढा येत होता.

शेवटी आनंद म्हणाला, ' आता हा आमचा फार ॲक्टिव मेम्बर आहे. शुक्रवारची एन. ए. मीटिंग घेतो. गर्दवाल्यांना बाहेर काढायसाठी वाटेल ते करायला तयार असतो. '



बाहेर पडलो. पॅसेजमध्ये आता शुकशुकाट पसरला होता. आनंद म्हणाला, ' उद्या आपलं सकाळचं इथलं काम झालं की माहीम भागातल्या गर्दवाल्या मुलांकडे जाऊ. त्यांना सांगून ठेवलंय मी. '

° ° °

# ३

माहीमला बसमधून उतरलो. आनंद नाडकर्णी कुठल्या कुठल्या रस्त्यानं नेत होता. अधून् मधून म्हणत होता, ‘ मी एकदा मागे इथं आलेलो आहे. तेव्हा तो भाग आला की मला नक्की ओळखू येईल. आपण त्या तिघांना निरोप दिलाय, तेव्हा ते अमर–अकबर–अँथनी आपली वाटच पाहात असतील. ’

‘ अमर, अकबर म्हणजे ? ’

आनंद हसून म्हणाला, ‘ ही तिघं ॲडिक्ट मुलं आहेत ना त्यातला एक विनय, दुसरा मकबूल आणि तिसरा फ्रेडरिक. तिघांची जिगर दोस्ती. त्यातल्या एकाला व्यसन लागलं, तसं दुसऱ्या दोघांनाही लागलं. मग एक आमच्याकडे ॲडमिट झाला तसे नंतर दोघेही झाले. तिघांची रिकव्हरी चांगली आहे. मकबूलकडे ईदच्या वेळी गेलो होतो, त्याच वेळी फ्रेडरिकने नाताळचं निमंत्रण देऊन ठेवलं होतं. म्हणून आज आपण त्याच्याकडे चाललोय. तसंच मग विनयकडे पण जाऊन येऊ. ’

शेवटी आनंदला ओळखीचा भाग दिसू लागला.

पिवळ्या रंगाच्या एका चार मजली इमारतीसमोर थांबलो आणि आत जाऊन मागच्या बाजूला असलेल्या तळमजल्यावरच्या फ्लॅटची बेल वाजवली. तेरा- चौदा वर्षांच्या एका काळ्यासावळ्या रंगाच्या, बॉबकट केलेल्या, फ्रॉकमधल्या मुलीनं दार उघडलं. आनंदला पाहून ‘ डॉक्टरसाब,प्लीज कम इन ’ असं म्हणाली. चेहऱ्यावर अप्रूप ओसंडत होतं. आत छोट्या खोलीत भला मोठा ख्रिसमस ट्री उभा केलेला होता. निम्मी–पाऊण खोली त्यानंच भरलेली होती. त्यावर बेगडाच्या रंगीबेरंगी पट्ट्या, फुलं, झुंबरे अडकवलेली होती. खोलीभर रंगीत पट्ट्यांच्या पताका लावलेल्या होत्या.

ती मुलगी म्हणजे फ्रेडरिकची बहीण. ती म्हणाली, ‘ इतका वेळ त्यानं तुमची वाट पाहिली. आता बाथरूममध्ये गेलाय. बसा ना तुम्ही. ’

आनंद म्हणाला, ‘ डेकोरेशन छान आहे. ’

ती हसून म्हणाली, ‘ त्यानंच केलं आहे. ’

‘ कसा काय आहे तो ? ’

‘ अच्छा है। ’

तिनं आतनं केकची मोठी प्लेट आणून ठेवली आणि आत दिसेनाशी झाली.

खोलीतल्या कपाटात नवा टेपडेक, स्टिरिओ सिस्टिम दिसत होती. आनंद म्हणाला, 'ह्याचे आई, वडील दोघंही दुबईला असतात. वडील कार्पेंटर आहेत. आई गव्हर्नेस आहे.'

'गव्हर्नेस ?'

'म्हणजे घर सांभाळणारी. ते तिकडे गेले. इथं हा मुलगा आणि त्याच्या दोन बहिणी. ते तिकडनं पैसे पाठवीत राहिले. इकडे याला हे व्यसन लागलं. सांभाळायला कुणी नाही. आलेले पैसे हा याच्यात संपवायचा. पाठवलेल्या या अशा वस्तूही विकून टाकायचा. याची, ही आता आली होती ती बहीण. . . तिला याचं इतकं टेन्शन आलं आणि इतकं असह्य झालं की तिनं बऱ्याच झोपेच्या गोळ्या खाल्ल्या. तिला हॉस्पिटलमध्ये ॲडमिट करावं लागलं. कशीबशी वाचली ती.'

फ्रेडरिक आंघोळ करून बाहेर आला. टिपिकल डोळ्याभोवती काळं, ओठ काळे, असा ब्राऊन शुगर ॲपिअरन्स. डॉक्टरांना घरी पाहून सद्‌गदित झाला. पटकन् बाहेर गेला. दहा मिनिटांनी हातात कोल्ड ड्रिंकच्या बाटल्या–बुचं उघडून, आत स्ट्रॉ घालून घेऊन आला. आनंद त्याच्याकडे इतर गर्दवाल्या मुलांची चौकशी करू लागला. 'तो अमका मीटिंगला येत नाही रे आजकाल ?'

'तो ना, तो परत घ्यायला लागला.'

'त्याला घेऊन ये ना एकदा माझ्याकडे. मी बोलावलंय म्हणून सांग. तो तमका का येत नाही ? तोही घ्यायला लागला का ?'

'नाही नाही. तो चांगला आहे. तो आता सर्व्हिसला लागला म्हणून त्याला मीटिंगला यायला वेळ भेटत नाही.'

त्याला घेऊन विनयकडे जायला म्हणून बाहेर पडलो. दोन- चार वळणं गेल्यावर एका कॉलनीपाशी आलो. पहिल्या मजल्यावरच्या फ्लॅटमध्ये विनय राहतो. दोन खोल्यांचे घर. घरात आई होती. विनय व्हिडिओवर पिक्चर बघायला कॉलनीतल्या कुणाकडे तरी गेलेला होता. फ्रेडरिक त्याला बोलवायला गेला.

त्याची आई म्हणजे जुन्या वळणाची, नऊवारी पातळ नेसलेली, कोकणी हेलानं बोलणारी होती. ती म्हणाली, 'त्याचंच टेबल मी आवरत होते. बघा, या बघा सिगरेटच्या चांद्या. . . सगळं फेकून देणार आहे. आमी अडाणी माणसं. आमाला हे कायबी माहीत नव्हतं. हा चांदीवर ते ओढत बसायचा. मी विचारायची, बाबा हे काय करतोस ? तो म्हणायचा, तुला काही नाही कळत, गप बस. मी आपली गप बसायची. एकदा श्री मासिकात छापून आलं होतं, तेवा अंगावर अंक फेकला आन म्हणाला, तू विचारत होतीस ना, हे वाच, म्हणजे



कळेल. मग मी ते वाचून घेतलं तेवा म्हनले; बाप रे. हे व्यसन करतोस, होय तू ? पण डॉक्टरसाहेब, तुमच्या दवाखान्यातनं आल्यापास्नं चांगला हाय. आता त्याला कामावर कधी पाठवायचं ?'

आनंद म्हणाला, 'बघू ना, या एक तारखेपासून गेला तरी चालेल.' त्या बाईंनी देवाला करतात तसा नमस्कार केला.

तेवढ्यात धावपळ करत विनय येऊन पोचलाच. विनय अगदी फ्रेडरिकच्या वयाचा, यष्टीचा आणि गर्दच्या चिन्हांमुळे जुळा भाऊच वाटत होता. म्हणाला, 'डॉक्टर, दोन मिनिटांत मी वरून येतो. आमच्यावरती आँटी राहतात ना, त्यांना तुम्हाला भेटायचंय.'

वरून एक मिनिटातच खाली आला. पाठोपाठ दहा मिनिटांनी मॅक्सी घातलेल्या, पस्तिशीच्या, सावळ्या, स्मार्ट दिसणाऱ्या, हसऱ्या चेहऱ्याची आँटी आल्या. पोनी टेल, फ्रॉक घातलेली त्यांची चौदा- पंधरा वर्षांची मुलगीही आली. आनंदला नमस्कार करून त्या म्हणाल्या, 'डॉक्टर, आपने बहुत अच्छा काम किया है। विनय आपके बारेमें बहुत बहुत बताता है। बडा अच्छा लडका है।'

विनय म्हणाला, 'डॉक्टर, या आँटी नसत्या ना तर मी तुमच्याकडे आलोच नसतो.'

आँटी संकोचानं म्हणाल्या, 'वैसा कुछ नहीं है।'

विनय म्हणाला, 'आँटी, त्या दिवशी तुमची बेल दाबली नसती ना, तर मी याच्यातच खलास झालो असतो.'

'क्या बात करता है !'

'खरं ना, आँटी शप्पत.' आमच्याकडे वळून तो म्हणाला, 'वर गच्चीला जायचा जिना आहे ना तिथं मी चेसिंग करत बसायचो. तो जिना यांच्या दारासमोरच आहे. त्या दिवशी चेसिंग करायला दातापुढे पाच पैशाचं नाणं धरतात ना, तेच नव्हतं माझ्याकडे. काय वाटलं कोण जाणे, पण मी यांची बेल दाबली आणि आँटीकडे नाणं मागितलं. त्यांना आश्चर्य वाटलं. हा सर्व्हिस करणारा पोरगा, याला पाच पैशाचं नाणं कशाला पाहिजे ? मग त्यांनी नीट चौकशी केली. मला रोज त्या समजावून सांगायच्या. मग फ्रेडरिकचं ऐकल्यावर त्यांनीच मला ॲडमिट व्हायचा आग्रह केला. वडील कडक आणि गप्प बसणारे, आई अडाणी. मला कुणी समजावून सांगितलंच नव्हतं. आतासुद्धा रोज सकाळी वर जातो. आँटीना पाहतो आणि मग दिवस सुरू. यांना पाहिलं की मी दिवसभर चांगला राहतो. पावडरचा विचारसुद्धा मनात येत नाही.'

आँटी जरा लाजल्यासारख्या होऊन म्हणाल्या, 'बडा अच्छा लडका है ये।

जब पीता था नं, तभी इसने किसीको तकलीफ नहीं दी थी। हमारी जवान लडकियाँ आती जाती थी, नजर भी नहीं उठाता। आपने इसे बचाया। हमपर बहुत एहसान हुए।'

त्यांच्या अंगावर रेलून बसून बोलणं ऐकत असलेल्या छोट्या मुलीकडे बोट दाखवून त्या म्हणाल्या, 'इन्हे तो ये बडा भाईही मिल गया। बडा अच्छा लडका है ये।'

चेहऱ्यावर त्यांनी स्मित राखलं होतं व डोळे वरचेवर पाण्यानं भरून येत होते.

चहा पिऊन आम्ही निघालो.

खाली उतरल्यावर मागे बांधकाम चालत असलेल्या इमारतीकडे बोट दाखवून विनय म्हणाला, 'इथं वर जाऊन मेणबत्ती पेटवून मी चेसिंग करायचो. कुणी डिस्टर्ब करायचं नाही.'

फ्रेडरिक माहीम स्टेशनकडे बोट दाखवून म्हणाला, 'तिथं समोरच गर्द मिळायची. पण आता पोलिसांचा छापा पडल्यापासून बंद झालंय.'

विनय म्हणाला, 'या माहीममध्ये गर्द पहिल्यांदा आणणारे आम्ही तिघंच. आम्ही ज्याच्याकडनं शिकलो ना, त्या माणसाला सूड म्हणून व्यसन लावलं गेलं होतं. त्यानं एकाचा खून केलेला होता. ज्याचा खून झाला त्याच्या भावानं ठरवून बदला घ्यायसाठी गोडीगुलाबीनं दोस्ती केली. त्या माणसाला व्यसन लावलं, स्वतःही त्या व्यसनात खलास झाला.'

आनंद म्हणाला, 'मागचं सगळं विसरायचं. आता चांगलं कसं राहायचं हा विचार आपण करायचा.'

विनय म्हणाला, 'आता सर्व्हिसला जातो एक तारखेपासनं. डॉक्टर, सर्टिफिकेट देणार ना रजेचं?'

'देतो, उद्या ये ओ. पी. डी.ला.'

'काय झालं म्हणून देणार? गर्दचं लिहिलं तर सर्व्हिसमध्ये पुढे त्रास होईल. आजचा साहेब चांगला आहे, पण उद्या कुणी त्रास देणारा आला तर या रेकॉर्डचा उलटा उपयोग पण करायचा.'

आनंद म्हणाला, 'तू त्याची काळजी करू नकोस.'

माझ्याकडे वळून म्हणाला, 'यांच्या सर्टिफिकेटवर डायग्नोसिस काय लिहायचं हा प्रश्नच असतो. खरं लिहून चालत नाही आणि खोटं तर लिहायचं नाही. मग मी काय करतो, या ड्रग ॲडिक्शनला सायकियाट्रीच्या पुस्तकात असलेले दुसरे अवघड शब्द वापरून डायग्नोसिस लिहून टाकतो. म्हणजे



डॉक्टरशिवाय दुसऱ्या माणसांना ते कळत नाही.'

मकबूल घरी नव्हता असा निरोप आला. म्हणून त्याच्याकडे जायचं रद्द केलं. दोघांचा निरोप घेतला आणि परतलो.

° ° °

# ४

के. ई. एम्. रुग्णालयातील सी. जी. सी. हॉल. हा एक नंबर वॉर्डासमोरनं सायकियाट्री वॉर्डकडे जाताना कोपऱ्यावरच आहे. हॉल म्हणजे दोन बाजूंनी अर्ध्या जाळ्या लावलेली कौलारू, उंच, भलीमोठी शेड आहे. आत एका कडेनं बाकड्यांची रांग. मधल्या भागात मध्ये बऱ्याच घडीच्या खुर्च्या ठेवलेल्या आहेत. मध्ये पोलिस कमिशनर सोमणांकडे एक निनावी पत्र आणि पाचशे रुपये आनंदच्या या बाबतीतल्या कामासाठी कुणीतरी पाठवले. आनंदनं ग्रुप थेरपीला खुर्च्या कमी पडतात म्हणून त्या पाचशेत बसतील एवढ्या खुर्च्या घेतल्या, आणि वर दुकानदाराला पटवून दोन खुर्च्या देणगीदाखलही मिळवल्या. अशा त्या मधल्या भागातल्या जुन्या खुर्च्यांमध्ये या नवीन स्टीलच्या खुर्च्या उठून दिसतात. बाजूला भिंतीवर अल्कोहोलिक ॲनॉनिमसची वचनं, पोस्टर्स लावलेली आहेत. एका भिंतीलगत टेबलावर फळा टेकून ठेवलाय. त्यापुढे आनंद उभा राहून सेशन कंडक्ट करतो.

सेशन घेताना तो दरवेळी आयडिया काढतो. गर्द मिळवण्यासाठी आपण कोणा कोणाला 'टोप्या' घातलेल्या असतात, अशा एका टोपीची हकीगत सांगायची, असं एखाद्या दिवशी सेशन व्हायचं. एकदा 'दोस्ती' हा विषय घेतला. त्या दिवशी प्रत्येकाने शेजारी बसलेल्याशी पाच- दहा मिनिटं बोलून ओळख करून घ्यायची आणि नंतर ओळीनं एकेकानं उभं राहून शेजारच्याची ओळख करून द्यायची. सगळ्यात चांगली ओळख करून देईल त्याला पहिला नंबर. असे तीन नंबर काढायचे. याचा जज्, मी पाहुणा म्हणून मलाच नेमलं. मी नंबर काढले.

शेवटी मी उभा राहिलो आणि म्हणालो, 'आता मी पण तुम्हाला तुमच्या नाडकर्णी डॉक्टरांची ओळख करून देतो.' त्यावर सगळ्यांनी उत्स्फूर्तपणे टाळ्या वाजवल्या. मी मग आनंद या गर्दवाल्यांमध्ये जसं काम करतो तसंच तो डायबेटीस झालेल्या लहान मुलांमध्येही करतो ते सांगितलं. त्यानं वैद्यकसत्ता नावाचं पुस्तक लिहिलं आहे, तो नाटकातनं कामं करतो, तो आणि त्याचे मित्र मिळून भरतशास्त्र, स्पंदन नावाचे अंक काढतात, हे सांगितलं. हे सगळं त्याच्या पेशंटना काहीच माहीत नव्हतं. त्यामुळे माझं भाषण संपल्यावर त्यांनी खूप टाळ्या

वाजवल्या. मग आनंदही उठून म्हणाला, आता मी पण या पुण्याच्या डॉक्टरांची ओळख करून देतो. मग त्यानंही माझी ओळख करून दिली. त्यावरही सगळ्यांनी टाळ्या वाजवल्या.

या ओळखीच्या कार्यक्रमानंतर आनंद म्हणाला, ' दोस्ती होण्यासाठी आपण दुसऱ्याशी बोललं पाहिजे. त्याची माहिती आपण करून घेतली पाहिजे. खरा दोस्त कोण हे कसं ओळखाल ? '

त्यावर काहींनी उत्तरं दिली.

नंतर विचारलं, ' खरा दुष्मन कोण ? '

त्यावरही काही उत्तरं आली. एकानं उत्तर दिलं, 'गर्द'. मग तो धागा पकडून आनंद म्हणाला,'म्हणजे आपला खरा शत्रू गर्द. गर्दकडे नेणाऱ्याला आपण काय म्हणाल, ' दोस्त की दुष्मन ? '

सगळे ओरडले, ' दुष्मन. '

' दुष्मनाचा दुष्मन तो आपला कोण ? '

परत सगळे ओरडले, ' दोस्त. '

मग अशा दोस्त आणि दुष्मनांचे अनुभव त्यानं सांगायला लावले. एक म्हणाला, ' मी एका कापडगिरणीत काम करतो. आधी आम्ही दोस्त दारू घ्यायचो. आमच्या गिरणीतल्या एकानं ही नवी नशा सहज ओढायला दिली. फुकट. आम्ही विरारवरनं यायचो. तो अंधेरीला चढायचा. त्यानं सांगितलं, ही नवी नशा दारूपेक्षा चांगली. तोंडाचा वास येत नाही म्हणून कामावर कुणाच्या लक्षात येत नाही. आणि सगळ्यांसमोर ओढली तरी सिगरेट ओढतोय असं वाटतं. दोन-तीन दिवस त्यानं फुकट दिली. पण तिसऱ्या दिवशी मात्र आम्ही अंधेरी स्टेशन येताच अगदी चालत्या गाडीतनं उडी टाकून, त्याला प्लॅटफॉर्मवर गाठलं आणि म्हणालो, 'चल लवकर. तुझी पावडर काढ.' या वेळी त्यानं दहा रुपये घेतले तेव्हा पावडर दिली. '

दुसरा एक सांगू लागला, ' याउलट माझं झालं. एक जण दोस्त गर्द ओढत होता, मी त्याला विचारलं हे काय आहे ? मला ओढू देतोस का ? त्याच्यावर तो म्हणाला,'तू याला हात लावू नकोस. फार वाईट व्यसन आहे. मी बरबाद झालोय. तसा तू होऊ नकोस.' तरी मी त्याचं ऐकलं नाही. एकदा एक झुरका पाहू म्हणून त्याच्याकडनं सिगरेट काढून घेतली. आणि मी त्याच्यात अडकलो. दोस्तानं मला सावध केलं होतं. पण मीच हातानं नुकसान करून घेतलं. '

आनंद म्हणाला, ' तुम्ही गर्द घ्यायला जायचे तेव्हा तिथं जाऊन जाऊन दोस्त झालेले लोक असतील ना ? आता असे लोक भेटले की तुम्ही काय कराल ?



त्यांना आता दोस्त मानाल का ? '

' त्यानं गर्द सोडली असली तर दोस्त मानू. नाहीतर दुष्मन. '

एक मधेच म्हणाला, ' मी दोन महिने चांगला आहे. पण त्या वेळचा कुणी भेटला की लगेच टर्की यायला लागते. अंगावर शहारे यायला लागतात. '

दुसरा त्याच्यावर म्हणाला, ' येवढंच कशाला, मी पूर्वी धारावीला जाऊन गर्द घ्यायचो. धारावीकडे जाणारी बस दिसली तरी मला टर्की यायला लागते. '

एक सुशिक्षित दिसणारा विद्यार्थी म्हणाला, ' रोज सकाळी रेडिओवर विविध भारतीमध्ये ठरावीक वेळेला ठरावीक जाहिरात लागली की मला आठवण होते. मी गर्दमधे अडकलो होतो तेव्हा सकाळी त्या वेळेला मी अड्ड्यावर घेत असायचो, तिथं रेडिओवर ही जाहिरात लागलेली असायची. आज तो आवाज ऐकला तरी मनात खळबळ व्हायला लागते. '

संभाषण असं कुठूनही कुठे वाहात असायचे. पण त्याला अनुरूप असं वळण आनंद द्यायचा.

हे झाल्यावर आनंद म्हणाला, ' ठीक आहे, असे दोस्त भेटले, बस दिसली, जाहिरात ऐकू आली तर टर्की येते याला उपाय काय ? '

परत लोक डोकं लढवू लागले.

आनंद म्हणाला, ' घंटी आणि भाकरीचा प्रयोग आठवतोय का जुन्या लोकांना ? रशियाचा एक मोठा शास्त्रज्ञ होता. त्यानं कुत्र्याला उपाशी ठेवलं. भाकरी देताना घंटी वाजवायचा, कुत्र्याला लाळ सुटायची. असं काही दिवस त्यानं केलं. मग नुसतीच घंटी वाजवली तरीही लाळ सुटायला लागली. असं त्यानं काही दिवस चालू ठेवलं. पुढं घंटी वाजली तरी लाळ सुटली नाही. याच्यावरनं आपण काय शिकायचं ? गर्द म्हणजे भाकरी, लाळ म्हणजे तीव्र इच्छा, आणि घंटी म्हणजे तेव्हाचे दोस्त. गर्द आपण सोडली. तेव्हाचे लोक भेटले की गर्दची आठवण होईल. पण तरीही आपण गर्दपासून दूर राहिलो. पुढं काय होईल बोला ? '

एक जण म्हणाला, ' ते भेटले तरी गर्दची आठवण होणार नाही. '

सगळ्यांनी टाळ्या वाजवल्या.

एका सेशनला आनंद नाडकर्णी म्हणाला, ' आपण गर्दपायी अनेकांना फसवलं असेल, टोप्या घातल्या असतील. प्रत्येकानं अशी एखादी टोपी घातल्याची हकीगत सांगायची. '

सगळे एकमेकांकडे पाहू लागले. आनंद म्हणाला, ' बोला, इथं सगळे आपण सारखेच आहोत. लाजायचं नाही. बोल संदीप . . . '

संदीप हा उंच, गोरा, शिकलेला तरुण मुलगा. तो म्हणाला, ' मी मुलुंडला

राहतो. पैसे मिळवण्यासाठी मी सोसायटीतल्या बऱ्याच घरात फिरायचो. भोपाळ दुर्घटनेसाठी मदत गोळा करतोय असं सांगायचो.'

मी विचारलं, 'पावतीपुस्तक होतं का तुमच्याकडे ?'

'पावतीपुस्तक कुठलं आलंय ? मी जाऊन तोंडीच मागायचो. माझ्या चेहऱ्याकडे बघून लोकांना विश्वास वाटायचा. घरामागे दहा रुपये तरी मिळायचेच. मी भोपाळचं पेपरमधे वाचलेलं असायचं. त्याच्या जिवावर बोलायचो. भोपाळनंतर जवळपास सात- आठ महिने मी रोजचे ब्राऊन शुगरपुरते म्हणजे पन्नास- शंभर रुपये असेच जमा करायचो. आज ही सोसायटी उद्या ती सोसायटी असं करायचो.'

मला त्या मुलाचं आणि त्याला पैसे देणाऱ्यांचं नवलच वाटलं. विषारी वायुग्रस्त लोकांना दिलेली मदत ब्राऊन शुगरग्रस्त माणसाच्या डायरेक्ट हातात पडत होती !

काळा, खडबडीत चेहऱ्याचा एक मुलगा उठून सांगू लागला, 'मी रेशनच्या दुकानात कामाला आहे. रॉकेलची गाडी चालवतो. अडीचशे रुपये पगार मिळतो. माझा व्यसनाचा खर्च, दोन वर्षांपूर्वीच्या स्वस्ताईच्या काळात सव्वाशे रुपये महिना होता. पण मी कुठे चोरीमारी केली नाही, उसनेपासने काढले नाहीत. रॉकेलच ब्लॅकनं विकायचो आणि व्यसनापुरते पैसे बरोब्बर काढायचो. आता गर्द सोडल्यावर डोक्यात येतंय की आपण हे पैसे वाचवले असते तर स्वतःची रॉकेलची गाडी घेतली असती, स्वतःचा धंदा आरामात करत बसलो असतो.'

अठरा ते वीस वयाच्या एका मुलाकडे वळून आनंद म्हणाला, 'विशू, तू काय काय केलंस ते सांग सगळ्यांना.'

विशू जरा लाजत उभा राहिला व म्हणाला, 'मी शिवाजी पार्कजवळ राहतो. आम्ही चार- पाच जण शिवाजी पार्कच्या कट्ट्यावर बसायचो. सिगरेटी ओढायचो. एका दोस्तानं ही पावडर आणली. बाकीच्यांना ती सवय लागलीच. पहिल्यांदा इतर मित्र माझा खर्च करायचे. पण लवकरच तेही तंगीला आले. मग मी काहीतरी करून पैसे उभे करायला लागलो.'

'काही तरी म्हणजे ?'

तो संकोचू लागला तशा बाजूच्या बाकावर बसलेल्या पन्नाशीच्या बाई उभ्या राहिल्या व म्हणाल्या, 'मी सांगते. मी विशूची आई. मी शिक्षिका आहे. विशूचे वडील काही कारणानं नोकरी सोडून घरी बसलेले आहेत. याला हे व्यसन लागल्यावर घरातल्या वस्तू नाहीशा व्हायला लागल्या. सोलापुरी चादरीसुद्धा चोरीला गेल्या. याला शिवलेले नवे कपडे विकायचा. मी विचारायचे, तो अमका



शर्ट दिसत नाहीरे ? तो म्हणायचा, असेल कुठं तरी. प्रत्येक वस्तू काही आपण कुलपात ठेवत नाही. कामाच्या वेळी एखादं भांडं पाहायला जावं तर भांडंच गायब. एकेदिवशी यानं घरातली ज्ञानेश्वरीसुद्धा विकली तेव्हा मला ब्रह्मांड आठवलं. शाळेत जायची मला घाई होती आणि हे लक्षात आलं. मला वाटलं, कशाला शाळेत जायचं आणि कशाला हा संसार ओढायचा. पण शाळेच्या ओढीनं गेले. यानं सगळ्या नातेवाइकांत आमचं नाव इतकं खराब करून टाकलं की बस्स. मी काटकसरीनं संसार करून कुणाच्या दारात रुपया मागायला कधी गेले नव्हते. पण आता ? कुणी भेटलं की विचारायचं, काहो, विशूच्या वडलांची तब्येत कशी आहे ? की मी समजायचं, या राजश्रींनी त्याच्याकडून पैसे आणले आहेत.' विशूचा चेहरा पडत चालला होता.

आनंदच्या ते लक्षात आल्यावर त्यानं विचारले. 'काय रे विशू, तुला व्यसन सोडावंसं कधी वाटलं ?'

विशू म्हणाला, 'ज्यानं आम्हाला हे व्यसन लावलं तो दोस्त स्प्लीनच्या विकारानं आजारी पडला. डॉक्टर म्हणाले, या व्यसनामुळंच स्प्लीन खराब झालीय. त्या दुखण्यातच तो वारला. तेव्हा एकदम धक्का बसला. आज हा वारला, उद्या आपली हीच पाळी. त्यामुळे सोडावंसं वाटलं.'

आनंद लोकांकडे वळून म्हणाला, 'विशूच्या आईनं व्यसन सोडायला खूप मदत केली. त्यांच्या लक्षात आल्यावर त्यांनी काय केलं, तर विशूला स्वतः पावडर आणून द्यायला सुरुवात केली आणि रोज कमी करत करत दोन- तीन महिन्यांत निम्म्याहूनही कमी प्रमाण केलं. त्यामुळे इथं ॲडमिट केलं तेव्हा त्याला टर्कीचा फारसा त्रास झाला नाही.'

या अनुभवांमधून विद्यार्थी किंवा गरीब घरातल्या लोकांनी चोऱ्या, फसवाफसवी केलेली दिसत होती. तर स्वतःचा धंदा करणारी माणसं धंद्यातले पैसे त्यात खर्च करून व्यसन भागवताना दिसत होती. उंच, शिडशिडीत, काळ्या रंगाचा आणि टिंटेड काचांचा चष्मा घातलेला तिशीचा मनोहर नावाचा एक तरुण बसला होता. त्याला आनंदनं उठवलं.

मनोहरजवळ छोटी, चार- पाच वर्षांची एक सावळी- गोड पोरगी खेळत होती. तिला खाली उतरवून तो उभा राहिला आणि म्हणाला,'माझा छोटा बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टरचा धंदा आहे. त्याच्यामुळे मला गर्दसाठी कुणाकडं पैसे मागावे लागले नाहीत. मी घरीच चेसिंग करत बसायचो. ही माझी छोटी मुलगी आहे ना, हिला पण कळायचं की तिचा बाप काही तरी वाईट करतोय. मी चेसिंग करीत असताना ती यायची. मांडीवर बसून म्हणायची, नका करू हे. एकदा तर तिनं माझ्या

हातातनं चांदी ओढून घेतली. चांदी, गर्दची पुडी . . . सगळं तिनं खिडकीतनं बाहेर फेकून दिलं. तेव्हा माझ्या मनात विचार आला— मुलीला हा प्रकार लहानपणापासून माहीत आहे, पुढे एखाद्या वेळी तिलाच व्यसन लागलं तर? या विचारानं शॉकच बसला. त्यामुळे एकदम मी याच्या बाहेर पडायचं ठरवलं. '

तिशीच्या, जाड चष्मा घातलेल्या, थोराड चेहऱ्याच्या एका माणसाला आनंद म्हणाला, ' जगन, तू काही बोलणार ? '

त्याचा चेहरा नेहमीच अंमल असलेला दिसतो. तो गालातल्या गालात हसला व म्हणाला, ' काही नाही सांगण्यासारखं. आपलं दुकान आहे, तेव्हा गल्ल्यातनं पैसे उचलायचो. बस्स. '

' तुझ्या आधीच्या व्यसनाविषयी सांग. '

' आधी दारू, मग चरस, मग साप चावून घ्यायला लागलो. '

बरेच जण आश्चर्यानं म्हणाले, ' साप ? '

आनंद म्हणाला, ' सापाविषयी जरा डिटेलमध्ये सांग. '

' तीन प्रकारचे साप असतात. एकदा चावून घ्यायला वीस रुपये, तीस रुपये, चाळीस रुपये असे दर असतात. कमी विषारी, जास्त विषारीवर हा दर असतो. एकदा चावून घेतलं की तीन–तीन, चार–चार दिवस नशा टिकते, माणूस सुम्म होऊन राहतो. '

' पण चावून घेतात कसे ? '

' सापाची वितभर साइझची पिल्लं असतात. एका फुटभर लांब डबीत एकेक पिल्लू ठेवलेलं असतं. जिथं चावून घ्यायचं असेल तिथं डबीचं तोंड न्यायचं, झाकण उघडायचं आणि झटकन डबीचं तोंड तिथं टेकायचं. साप डंख मारतो की परत डबी उपडे करून बंद करतात. पहिल्यांदा मी हातावर, पुढच्या बाजूला घ्यायचो. नंतर हाताच्या बोटाच्या टोकाला मांसल भाग असतो तिथं घ्यायला लागलो. तसंच पायाच्या बोटांनाही खालच्या बाजूने घेतात. काही लोक नशा लवकर यावी म्हणून जिभेच्या खालच्या भागावर साप चावून घेतात. '

माझ्याकडे वळून म्हणाला, ' तुमच्या पुण्यालाबी हे आहे. अल्पना टॉकीजच्या मागच्या बाजूला, नागझरीमध्ये सापाचा धंदा करणारे लोक आहेत. '

' ब्राऊन शुगरकडे कसे वळलात ? '

' ही सापाची नशा सुटावी म्हणून. पण हे व्यसन लागल्यावर कळलं, की ही सापापेक्षाही भयंकर नशा आहे. '

मुळात ' टोप्या घालण्याच्या ' अनुभवांचं सेशन बरंच इकडेतिकडे भरकटत होतं. पण आनंद तसं ते जाऊ देत होता. शेवटी तो म्हणाला, ' आपण



टोप्या घालण्याचे अनुभव का सांगायला लावले ? तुम्ही किती बदमाश आहात हे सिद्ध करायला का ? तर नाही. आपण जे जे केलं ते सांगताना आपल्याला लाज वाटली नाही पाहिजे. उद्या तुम्ही कामावर जाल, तिथं तुम्हाला कुणी या गोष्टींवरनं चिडवील. मग तुम्हाला राग येणार. राग डोक्यात चढला की तुम्ही काय करणार ? '

एकजण उत्स्फूर्तपणे म्हणाला, ' गर्दकडे जाणार. '

' बरोबर. हे होता कामा नये, म्हणून एखादा कुणी तुम्हाला चिडवायला लागला तर तुम्ही म्हणायला पाहिजे, ' हेच काय त्या काळात याहूनही मी अमुकअमुक लाजिरवाणे प्रकार केलेत. त्याचं आज मला वाईट वाटतंय. आज त्यातनं मी बाहेर आलोय. आपण काय मुळात वाईट होता का, मुळात चोर होता का ? '

' नाही. ' बरेच जण म्हणाले.

' मग तुम्हाला ही चोरी, ही फसवाफसवी कुणी करायला लावली ? '

' गर्दनं. '

' म्हणून व्यसन ही एक प्रकारची बीमारी है। इस बीमारी से हमें अच्छा होना है। म्हणून आपण कुठलं वाक्य लक्षात ठेवायचं ? तर ' हम बुरे नहीं हैं, हम बीमार हैं। '

सगळ्यांचे चेहेरे उजळले.

ग्रूप थेरपीचं सेशन संपलं की आनंदच्या टेबलाभोवती गर्दी उसळायची. प्रत्येकजण केसपेपर पुढे करून पुढे घुसायचा. आनंद त्या गर्दीतही त्याला काहीतरी विचारून गोळ्यांमध्ये बदल करून देऊन कागद सही करून द्यायचा. लोक वर्ग सुटल्यावर मुलं जशी रेंगाळतात तशी एकमेकांशी गप्पा मारीत रेंगाळायची. हळूहळू हॉल खाली व्हायचा. फक्त नातेवाईक आनंदशी डिटेल बोलायला थांबून राहायचे.

० ० ०

# ५

महिनाभर पुण्यात राहून परत या गर्दवाल्यांची माहिती घ्यायला मुंबईत आलो होतो. या वेळी मित्राची स्कूटर मिळविली होती, म्हणून मला आणि आनंद नाडकर्णीला काही बऱ्या झालेल्या ॲडिक्ट्स्च्या घरोघर जाणे सोपे जात होते.

गेल्या वेळेला एका संध्याकाळी आनंदला भेटायला सायन कोळीवाडा विभागातले तिघं जण आले होते. तिघांनी के. ई. एम.ची ट्रीटमेंट घेतलेली होती. एक गोरापान, हीरोटाईप राहणारा शेखर, दुसरा काळा, सौम्य चेहऱ्याचा, व्यवस्थित भांग पाडलेला गौतम आणि तिसरा शिडशिडीत, उंच, केसाची झुलपं डोळ्यावर आणलेला राजू. तिघांनीही घरी यायचं आमंत्रण दिलं होतं. त्यांच्याकडे आज निघालो होतो.

स्कूटरवर आनंद सांगत होता. ' तो गोरा गोरा मुलगा होता ना शेखर, तो रिलॅप्स झाला. '

मला आश्चर्य वाटलं. कारण गेल्या वेळी तिघांत त्याचाच चेहरा सगळ्यात साफ दिसत होता. इतर मुलांना आणण्यामध्ये याचा पुढाकार होता.

मी विचारलं, ' कशामुळे ? '

' काही समजलंच नाही. राजू म्हणून दुसरा उंचेला होता ना, तोही परत प्यायला लागला होता, पण त्यानं एकदाच पावडर घेतली. नंतर त्या गौतमनं याला आणलं माझ्याकडे. तेव्हापासून परत घेतली नाही त्यानं. ते दोघं आज भेटतील आपल्याला. '

' मुळात हे तिघं आले कसे तुझ्याकडे ? '

' अंकलनं आणलं. एक डिसोझा म्हणून आहे. त्याला सगळे अंकल म्हणतात इकडं. हिंदुस्थान लिव्हरमध्ये कामाला आहे. असली सणसणीत तब्येत आहे. सॉलिड टेरर आहे. त्यानं अनेक ॲडिक्ट धरून आणले होते, आमच्याकडे ॲडमिट केले होते. आमचा चांगला सोशल वर्कर आहे. त्यानं या तिघांना आमच्याकडे आणलं प्रथम. '

ती चाळींमधली सुस्त दुपार होती. पायऱ्यापायऱ्यांनी तरुण पोरांचे कंपू निवांत गप्पा मारीत बसलेले होते. मागून डॉक्टर, डॉक्टर असं ओरडत कुणीतरी

येत होतं. पाहिलं तर राजू. आम्ही स्कूटर थांबवली. त्यानं त्याच्या घरी आणलं. आम्हाला बसवलं. गौतमला बोलावून आणायला तो गेला.

घरात ख्रिस्ताच्या तसबिरी कॅंडल स्टॅंड दिसत होते. आनंद म्हणाला, ' राजूचं सगळं नाव ख्रिस्तराज आहे. याचे वडीलही अल्कोहोलिक. '

मला वाटलं, राजूच्या आईची स्थिती काय झाली असेल ? आधीचं आयुष्य नवऱ्याच्या व्यसनाचा त्रास काढला आणि उतारवयात मुलाच्या या व्यसनाचा त्रास भोगावा लागतोय.

पन्नाशीची चिटाच्या कापडाचा फ्रॉक घातलेली आई बाहेर आली. साठ–पासष्टीचे वडीलही.

आनंदनं विचारलं, ' राजू परत कशी घ्यायला लागला ? '

वडील म्हणाले, ' त्याचा स्वभाव लय तडकू हाय. आईचं आन् त्याचं काही तरी झालं तसा तडकला. गेला आन् प्यायला लागला. '

आई म्हणाली, ' पण आता सोबर हाय. मागं खूप त्रास दिला त्यानं. पैसे पाह्यजे, बास. दुसरं काही सुचायचं नाही त्याला. नाही दिले की फेकाफेक करायचा. '

वडलांनी उठून खिडकीचे पडदे दूर केले व म्हणाले, ' वस्तू फेकायचा, त्यानं बघा सगळ्या काचा कशा फोडल्यात. ' पाहिलं तर खरंच, प्रत्येक काच अर्धवट फुटलेली होती.

आई म्हणाली, ' एकदा तर हे समोरचं शोकेसवालं कपाटच गदागदा हलवायला लागला. पैसे दे नाही तर पाडतो म्हणाला. मी घाबरून गेले. पण बाजूचे लोक मदतीला आले. त्यांनी मग त्याला आवरलं. '

मी राजूच्या वडलांकडे बोट करून म्हटलं, ' यांनाही ड्रिंकिंगची सवय होती ना ? '

आई लगेच म्हणाली, ' यांचा काही तरास नव्हता. पियाचे पन त्रास देयाचे नाहीत. या पोराचं काही विचारूच नका. '

वडील म्हणाले, ' हम पीते थे लेकिन किसीपर हाथ नहीं उठाया पूरी जिंदगी में. '

तेवढ्यात राजू आणि गौतम आलेच.

गौतम आनंदला म्हणाला, ' राजू चिडतो पटकन. त्याला तुम्हीच समजावून सांगा. परवा पिक्चरला गेलो. तिकिटाच्या लायनीवरनं कुणाशी तरी भांडण झालं. हा गेला धावून. ती चार–सहा पोरं. आम्ही दोघंच. त्यांनी सांगितलं, पिक्चर संपल्यावर थांबा, मग तुम्हाला दाखवतो. पिक्चर सुटल्यावर मी म्हटलं, चल,



आपण निघून जाऊ. पण याला खुमखुमी फार. तो जाऊन चार–पाच ठोसे लगावून आला पळून. आता तिथं पोलिस नंतर शोधाशोध करत होते. सापडला असता तर ? आणखी कटकट झाली असती. आधी याला नोकरी नाही मिळत. त्यात असलं रेकॉर्ड झालं तर ? '

राजू म्हणाला, ' आपल्याला कुणी डोस दिला तर आपलं डोकंच आऊट होतं. '

आनंद म्हणाला, ' तू मला एकदा संध्याकाळी भेटायला ये. मग आपण बोलू. '

एक मांजर येऊन राजूच्या मांडीवर बसलं होतं. गौतम म्हणाला, ' हा राजू असा आहे, त्यानं या मांजरालाबी सवय लावली होती. ' राजू त्याला सांगू नको, सांगू नको म्हणू लागला. आम्ही आग्रह केला तसं राजूनंच सांगितलं. ' मी संडासात जाऊन चेसिंग करत बसायचो. मांजराला लाडानं संडासात न्यायचो. त्याला पण ती वाफ हुंगायला लावायचो. त्यालाबी गर्दची सवय लागली. मी जेव्हा गर्द सोडली तवा याला मिळेना. त्याला टर्की यायला लागली. इकडून तिकडे नुसत्या उड्या मारायला लागलं. तवा अंकल इथं होता. तुम्ही मला घरी घ्यायला गोळ्या दिलत्याना, त्यातली एकेक गोळी अंकलनं कुटली. दुधात कालवून अंकलनं या मांजराच्या घशात वतली. तवा त्याची टर्की थांबली. '

आम्ही हसू लागलो. आनंद म्हणाला, ' सी हाऊ क्लेव्हर दीज पीपल आर. '

मला या अंकलविषयी फारच कुतूहल वाटू लागलं. विचारलं, ' कुठे भेटेल अंकल ? मला भेटायचंय त्यांना. '

राजू म्हणाला, ' अंकल भायखळ्याला राहतो. मधे आजारी होता, त्यामुळे घरीच भेटेल तो. '

गौतमच्या घरी जायला निघालो. त्याचं घरही दोन खोल्यांचं. त्याच्या घरात भाऊ, वहिनी आणि त्यांची मुलं. आई-वडील नुकतेच वारलेले. भाऊ रात्रपाळीचा. त्यामुळे झोपलेला.

तिथून शेजारच्या बिल्डिंगमधल्या अहिरे नावाच्या माणसाकडे गौतमनं आम्हाला नेलं. अहिरे हे तीस–पस्तिशीचे, मिश्या राखलेले, चंदेरी काड्यांचा चष्मा लावलेले गृहस्थ. अहिरे म्हणाले, ' हा गौतम, इतका चांगला मुलगा पण या व्यसनापायी केवढं नुकसान करून घेतलं होतं यानं. '

मी गौतमला विचारलं, ' कसं लागलं तुला हे व्यसन ? '

' वडिल गेले, आई मागंच गेली भावाकडं राहायचं म्हणजे कसं असतं ते सांगायला नकोच तुम्हाला. शिकून नोकरी मिळेना. केटरिंगवाल्याच्या

हाताखाली कामं करायला लागलो. मग हा राजू, मी आणि धाकटा भाऊ मिळून केटरिंगची लहान लहान कामं मिळवायला लागलो. पण कधी ती कामंही मिळायची नाहीत. पैसा मिळवून आणला तरच घरात स्थान. नाहीतर जाच. त्यातनं दोस्तांच्या बरोबरीनं हे व्यसन लागलं. पुढचे तर हाल विचारूच नका. '

' नोकरी नाही किंवा उत्पन्न नसताना व्यसनाला पैसे आणायचे कुठून ? '

' काहीही कामं करायचो. आमच्या इथं बिल्डिंगला तडे जातात ना, तिथं डांबर भरायचं काम चाललं होतं. वरनं टाकीच्या पाईपला किंवा अँटेनाला दोरी बांधून त्याच्यावर फळी अडकवलेली असायची. इतक्या वर जाऊन डेंजरमध्ये काम करायला कुणी तयार नसायचं. पण मी तयार व्हायचो. मी पूर्वी कधी असली कामं केली नव्हती. पण गर्दसाठी कुठलंही काम करायचो. पाच-दहा रुपये मिळाले की दिवस निभवायचा. '

' फसवाफसवी ? '

' नाही फारशी. गेटपाशी उभं राहून घरातलं कुणी आजारी आहे म्हणून उसने पैसे मागायचो. '

अहिरे म्हणाले, ' तसा तो मुळातला मुलगा चांगला आहे. पूर्वी कधी चोरी केली नव्हती, पण यासाठी करावी लागली. '

गौतम म्हणाला, ' मी बिल्डिंगवरच्या टाकीची झाकणं चोरून भंगारमध्ये विकायचो. एकदा पकडलो गेलो, मग ते सोडून दिलं. '

' कसा पकडला गेला ? '

' टाकीवर जायचो. कडेने रेल्वे लाईन आहे. लोकलच्या आवाजात वरनं झाकण खाली टाकून द्यायचो. नंतर रात्री विकायचो. एकदा वरनं खाली झाकण टाकलं, तर जवळच एक मुलगा लघवीला उभा होता. त्याच्या डोक्यात पडलं असतं तर तो मेलाच असता. पण जवळ पडलं. मी खाली येताच त्यांनी पकडलं. पण कॉलनीतला मुलगा आहे, म्हणून सोडलं. ' आमच्या सगळ्या बिल्डिंगवरच्या टाक्या बघा, अजूनही त्यांच्यावर एकही झाकण दिसणार नाही. तसंच या पार्क-भोवतीच्या कुंपणावरचे तुकडे तोडायचो. '

त्यानं दाखवलं. समोर गार्डनला लोखंडी उभ्या गजांचं कंपाऊंड होतं. वरच्या बाजूला आडवी लोखंडी पट्टी होती आणि त्यातून सहा इंचाची गजाची टोकं वर आलेली होती. गौतम पाईपचा तुकडा बरोबर ठेवायचा. गजाचं टोक त्यात घालून पाईप ओढायचा की त्याचा तुकडा पडायचा. असे तुकडे भंगारमध्ये विकून पैसे उभे करायचा. सगळ्या कंपाउंडला एकाही गजाचं टोक वर आलेलं दिसत नव्हतं.



अहिरे म्हणाले, ' मला याचं व्यसन कधी लक्षात आलं, माहीत आहे का ? मी एकदा गच्चीवर गेलो होतो तेव्हा याला पाहिला. यांची बिल्डिंग दुसरी, पण गच्चीवर आमच्या बसायचा. तर याच्या चेहऱ्यावर येवढ्या वेदना आणि डोकं पार जमिनीला टेकलेलं. मी चौकशी केली. याला गर्द नाही मिळालं की त्रास व्हायचा. तर हा गच्चीवर एकटा तो सहन करीत बसायचा. जवळपास रोज. अन्न खायला मिळायचं नाही. '

गौतम म्हणाला, ' मी त्या काळात चार आण्याचा पाव आणि चार आण्याची उसळ असा आठ आण्यांत दिवस काढायचो. जेवढे पैसे उरतील ते गर्दसाठी वापरायचो. तब्येत तर इतकी ढासळली होती की बस्स. '

राजू हसत म्हणाला, ' आमच्या इथल्या गणेश मंडळाचे लोक म्हणत होते, या वर्षी या दोघांचे फोटो फ्रेम करून लावावे लागणार आपल्याला. इतके आम्ही गेल्यातच जमा झालो होतो. '

अहिरे म्हणाले, ' माझ्या आईनं गौतमला सांगितलं, तुझं बाकी काही असू दे, तुला दोन वेळ मी जेवायला घालीन. तेव्हापासून याचं जेवण तरी नियमित झालं. '

गौतम म्हणाला, ' आजी फार चांगल्या. नाही तर व्यसनी माणूस म्हटला की कुणी दारात उभं करत नाही. '

अहिरे म्हणाले, ' मग मी याच्या भावाला, वहिनीला समजावून सांगितलं, कॉलनीतल्या पोरांना सांगितलं, याला चिडवत जाऊ नका. अशी लोकं जीव लावल्यानंच सुधारतात. पुढं काय करायचं ते माहीत नव्हतं. मग आमच्या कंपनीत डिसोझा म्हणून आहे त्याला सांगितलं. मग त्यानं यांना के. ई. एम.ला नेलं. '

' डिसोझा म्हणजे आपला अंकल. '

' कोण आहेत हो हे अंकल ? '

' हा स्वतःच व्यसनी होता. कंपनीच्या दारात पडून राहायचा. ए. ए.च्या लोकांनी त्याला त्यातनं बाहेर काढलं. तेव्हापासून या कामात त्याला फार इंटरेस्ट. '

राजू म्हणाला, ' अहो, गर्दचे अड्डेच्या अड्डे अंकलनं एकट्यानं उद्ध्वस्त केलेत. त्याला भीतीच नाही. '

' मग धोका असेल अशा माणसाला ? '

अहिरे म्हणाले, ' स्कूटरवर फिरतो. गन बरोबर असते. मी आणि तो कुठे

बरोबर जाणार असलो तर मला सांगायचा, तू बसनं ये. माझ्या स्कूटरला कोण कधी डॅश मारेल सांगता येत नाही. तू कशाला माझ्याबरोबर मरतोस? डेअरिंग तर येवढं आहे की, मधे पनवेलला हार्टअटॅक आला त्याला, तर तिथून तशीच स्कूटर चालवत आणली आणि मुंबईत येऊन स्वतः हॉस्पिटलमध्ये ॲडमिट झाला. बरा होऊन घरी गेला. डॉक्टरांनी स्ट्रिक्ट विश्रांती घ्यायला सांगितली. तरी याला कुठं गप्प बसवतंय, हा परत असल्याच कामासाठी बाहेर पडला. आणि आता त्याला नुकताच दुसरा अटॅक आलाय. '

आनंद म्हणाला, ' अंकलनं पेशंट आणला ना ॲडमिट करायला तर तो रात्र रात्र पेशंटबरोबर राहणार, पेशंटला टर्की येत असते तेव्हा त्याला सांभाळायला अवघड असतं. पण तो ते करतो बुवा. '

सगळ्यांचा निरोप घेऊन निघालो.

भायखळा चर्चजवळच्या फ्लायओव्हर खालून जाणाऱ्या रस्त्यावर अंकलचं घर शोधून काढलं. अंकलला बघून अपेक्षाभंगच झाला. गोरा, गोबऱ्या नाकाचा, दोन-तीन सोन्याचे दात असलेला, टक्कल पडलेला आणि मध्यम यष्टीचा तो माणूस होता. एखादा सरकारी अधिकारी वाटावा असा. मला आनंद हळूच म्हणाला, ' आत्ता दिसतोय ना त्याच्या अक्षरशः तो दुप्पट होता. त्या वेळी बघूनच त्याची टेरर वाटायची. आता म्हणजे वाघाची शेळी झालाय. '

त्याला काही बोलता येत नव्हतं. त्याची भुवया कोरलेली बायको तिथं येऊन बसली होती. ती म्हणाली, ' दुसऱ्या अटॅकनंतर जीभ लुळी पडलीय. '

आनंद म्हणाला, ' स्पीच थेरपीस्टला दाखवून घेऊ आपण. '

बायको म्हणाली, ' आज स्पीच थेरपीस्टचीच अपॉइन्टमेंट होती, तिकडे हा गेला. पण वाटेत त्याला कळलं की कुणीतरी गर्द परत घ्यायला लागलाय. मग त्याला झापण्यासाठी हा डॉक्टरकडे न जाता तिकडेच गेला. '

अंकल गालातल्या गालात हसला.

बायको म्हणाली, ' डॉक्टर, याला तुम्ही विश्रांती घ्यायला सक्ती करा. आणि सांगा आता बाहेरची कामं करायची नाहीत. '

आनंद म्हणाला, ' कामं केल्याशिवाय त्याला राहवणार नाहीच. तेव्हा तसं सांगण्यात काही अर्थच नाही. फक्त अंकल, एक करा जे कराल ते तब्बेतीला सांभाळून करा. '

अंकलनं मान हलवली.

अंकल हातवारे करून आनंदशी खूप बोलत होता, पण आम्हाला त्याचं



बोलणं काहीच समजत नव्हतं. आम्ही हातानीच त्याला खूण केली. निरोप घेतला आणि निघालो.

नंतर काही महिन्यांनी आनंद पुण्यात आला तेव्हा म्हणाला, ' एक बॅड न्यूज आहे. अंकल डिसोझा परत दारू घ्यायला लागला. आठ वर्षं सोबर राहिल्यावर स्लिप होणं म्हणजे अनुज्ज्वल.. त्याला मित्राने ॲडमिट करायला आणलं. मी ॲडमिट करून घेतलं. रात्री वॉर्डातनं पळून गेला तो घरीही गेला नाही. आणि कुठं सापडतही नाही. '

मी म्हटलं, ' त्याच्या त्या आजाराला कंटाळून स्लिप झाली की काय ? '

आनंद म्हणाला, ' मला तसंच वाटतंय. पण आमचा हा खंदा वीर कामातनं जायला नको होता. मोरालवर परिणाम होतो त्यानं. '

° ° °

# ६

एकदा आनंद नाडकर्णी सांगत होता, ' एखाद्या एरियातला एखादा पोरगा आमच्याकडे ॲडमिट झाला की त्या एरियातल्या पोरांची लाटच येते. आमची लिस्ट बघशील तर एकेका वस्तीतले, एकेका चाळीतले बरेच लोक दिसतील. '

' एकाच्या नादाने दुसऱ्याला व्यसन लागत असणार. '

' आणि तसं सुटण्याची धडपडही एकाच वेळी सुरू होत असणार. आता घाटकोपरचंच बघ. तिथं रमाबाई आंबेडकर नगर नावाची झोपडपट्टी आहे. तिथली दोन पोरं ॲडमिट होऊन, बरी होऊन परत गेली. त्यानंतर सारखे लोक येऊन धडकताहेत. पण आमच्याकडे इतक्या लोकांना एकदम ॲडमिट करायला सोयी नाहीत. '

' मुळात आले कसे ते इथं ? त्यांना इथं-जा, म्हणून कुणी सांगितलं ? '

' तिथं त्या स्लममधल्या लहान मुलांमध्ये काम करणारी बाल–वर्ष प्रतिष्ठान नावाची एक ॲक्टिविटी आहे. राजू कानेटकर नावाचा जुना युक्रांदवाला आहे. तो ती चालवतो. नंतर तिथे टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सचे विद्यार्थी फील्ड वर्कसाठी म्हणून जातात. त्यांनी मला भेटून प्रोसीजर समजावून घेऊन दोघांना ॲडमिट केलं, तिथून हे सुरू झालं. '

रमाबाई आंबेडकर नगर हायवेलगत वसलेलं आहे. एक मजली छोटी छोटी, लांबट चाळवजा घरं. . . काही मातीची, काही पत्र्याची. अधूनमधून पानपट्टीची खोकी, किराणा मालाची दुकानं.

म्युनिसिपल शाळेची चौकशी केली. तसं कुणी तरी समोरची बैठी छोटी चाळ दाखवली. ऑफिसात गेलो. अरुंद जागेत बऱ्याच खुर्च्या मांडल्या होत्या. राजू कानेटकर हा गोरा, जाडजूड, घाऱ्या डोळ्यांचा तरुण होता. शेजारी काळे-सावळे चुणचुणीत चेहऱ्याचे गायकवाड सर बसले होते. पलीकडे जरा गुबगुबीत अंगाची पण कोवळ्या चेहऱ्याची, मुळातली बंगाली पण प्रयत्नपूर्वक मराठी बोलणारी कावेरी बॅनर्जी ही टाटा इन्स्टिटयूटची विद्यार्थिनी बसली होती.

मी राजूला विचारलं, ' तुम्हाला या प्रश्नात कसा काय इंटरेस्ट वाटला ? '

राजू म्हणाला, ' आम्ही झोपडपट्टीतली मुलं शाळा का सोडतात याची

पाहणी करत होतो. शाळा मध्येच सोडणाऱ्या मुलांमध्ये आम्ही कार्य करतो. या गर्दमुळे शाळा सोडल्याचा प्रकार कळल्यावर त्याची चौकशी करू लागलो.'

'पण शाळेतल्या मुलांचा काय संबंध याच्याशी? ड्रॉपआऊट तर पहिल्या ४/५ इयत्तांपर्यंतच होतात ना? आणि हे व्यसन तर तरुण मुलांचं आहे.'

गायकवाड सर म्हणाले, 'अहो, हे व्यसन सुरुवातीला मोठ्या मुलांमध्ये होतं. तसं वर्षा–दीड वर्षापूर्वी आमच्या वस्तीत ते नव्हतंच. इथं पंजाबी टॅक्सीवाले बरेच राहतात. एअरपोर्टची ट्रीप करणाऱ्या एकानं ते पहिल्यांदा आणलं. तिथून ते तरुण पोरांत पसरलं. आता ते शाळेच्या मुलांमध्ये पसरलंय.'

'शाळेतली म्हणजे किती वयाची?'

'दहा दहा वर्षांची मुलं याच्यात सापडलीयेत.'

कावेरी म्हणाली, 'तो संदीप तर नऊ वर्षांचा आहे.'

गायकवाड म्हणाले, 'वर्गात मागच्या बाकावर ही मुलं सारखी झोपा का काढतात ते शिक्षकांना कळेना. त्यांनी हलवून उठवलं तरी त्यांच्याकडे पाहायची आणि परत पेंगू लागायची. मग आम्ही चौकशी केली तेव्हा कळलं की ही पोरं पावडर घेतात. यांच्यातली मग बरीच पुढं शाळाही सोडून देऊ लागली.'

फुलशर्ट पॅंटमधले जाडगेले, पन्नाशीचे, मिश्या पांढुरक्या पडलेले सोनावले मामा आले. राजू म्हणाला, 'सोनावले मामांना इथं सगळी पोरं घाबरतात. त्यांनी पावडर घेणाऱ्या पोरांना खूप दम भरला. एकाची तर धिंड काढून त्यांनी एका पोराला चौकात खांबाला बांधलं आणि फटकून काढलं.'

सोनावले मामा मान हलवून म्हणाले, 'पण त्याचा या पावडरपुढं काही उपयोग होत नाही.'

तेरा–चौदा वर्षांची, हाफ पॅंट, बुश शर्टमधली दोन मुलं बाहेरनं धावत आली. आनंदकडे बघून हसली. आनंद म्हणाला, 'हा नंदू आणि हा वसंत. हे आमचे दोघे पहिले वीर.' त्यांच्या दोघांच्या डोळ्याभोवती काळं झालेलं होतं. नंदू म्हणाला, 'सगळी पोरं तिकडं थांबलीत. बोलीवलंय.'

आम्ही सगळे उठून वस्तीतल्या मुख्य रस्त्यानं चालू लागलो. काही अंतरावर समता मित्र मंडळ अशी पाटी असलेली बारा बाय बाराची झोपडी होती. चार-सहा खुर्च्या ठेवलेल्या होत्या. बाहेर घोळके जमले होते. आत जायला कुणी तयार नव्हतं. आत चार-सहा बाया आणि काही पोरं होती. आम्ही आत जाऊन बसल्यावर नऊवारी पातळ नेसलेली चुणचुणीत चेहऱ्याची चाळीशीची बाई उठून आमच्यापाशी आली. म्हणाली, 'मी नंदूची आई.' नंदू तिथं जरा लाजून उभा होता. आई म्हणाली 'काय या पोराला नाद लागला व्हता, पैशासाठी निसती



भिरभिर करायचा पघा. अवो, वस्तीतल्या बायामानसांची लुगडीबी धुऊन द्यायचा चार पैशांसाठी. हेच्या बापानं लय मारलं ह्याला. अगदी रकत काढलं. पन ह्या पावडर घेनाऱ्यांना मार लागतच न्हाय. सुटलं का लगी पळालंच तिकडं पावडर घ्यायला. आमी याच्यासाठी देवाचं बी बघितलं. नारळ फोडला. कोंबडी दिली. पन ह्ये येड काही येगळंच. मस वाच ठिवायचो, पन तरी पळायचंच पघा तिकडं. आता तुमच्याकडं जाऊन आल्यापासून मात्र बरा हाय.'

एक अमीना नावाची मळक्या पंजाबी ड्रेसातली विशीतली मुलगी आली. गायकवाड सर म्हणाले, 'हिच्या भावानं घरी खूप त्रास दिला. आईला, बहिणीला पैशासाठी खूप मारायचा. शेवटी पोलिस कंप्लेंट केली. आता तो लॉक अपमध्ये आहे. तिथं त्याला पावडर मिळणार नाही म्हणून त्या काळजीत आहेत. त्यांनी कंप्लेंट मागं घ्यायची तयारी दाखवली तरी पोलिस सोडत नाहीत. त्यांना यात पैसे खायचे आहेत, अशी भानगड होऊन बसली आहे.'

लोक बाहेर थांबल्यानं सभा सुरू होईना. सोनावले मामा उठले, गुरं हुसकावी तसं त्यांनी सगळ्या पोरांना आत आणलं. शाळेतली बरीच छोटी पोरंही त्यात होती. केस वाढवलेली तरुण पोरंही होती.

आणि तिथं सभाच सुरू झाली. एका दांडीवर दहावीस हडकुळे हार घेऊन दोघं जण उभे होते. आहिरे म्हणून समता मित्र मंडळाचे अध्यक्ष होते, त्यांनी आनंदला, मला, राजू, कावेरी यांना हार घातले आणि नंतर नंदू आणि वसंत यांना उभं केलं. तोपर्यंत माईकही आला होता. माईकवर ते म्हणाले, 'आपण रमाबाई नगरातली दोन मुलं वसंत होवाळे, नंदू कांबळे यांनी हॉस्पिटलमध्ये दाखल होऊन गर्दपासून सुटका करून घेतली आणि इतर मुलांसमोर आदर्श ठेवला, याबद्दल त्यांचा मी सत्कार करतो.'

मी चाट झालो. मध्यमवर्गीय कुटुंबात एखादा मुलगा व्यसनी होतो त्याविषयी केवढी लपवाछपवी असते. इथं सगळाच मोकळा कारभार.

ती मुलंही, शाळेत बक्षीस घेताना जसा चेहरा करतात तशा चेहऱ्यानं उभी होती. हार घालून घेतले. सत्काराला उत्तर म्हणून नंदूनं भाषणही केलं.

म्हणाला, 'वस्तीत सगळे आम्हाला गर्दुल्ला, गर्दुल्ला असं चिडवतात. पण डॉक्टरसाहेबांच्या कृपेमुळं आम्ही आता गर्दुल्ला राहिलेलो नाही. आम्हाला कुणी कितीही चिडवलं तरी आम्ही लक्ष देणार नाही. मी हॉस्पिटलमध्ये दाखल व्हायला निघालो तवा लोक म्हणाले, हॉस्पिटलमधी मारून टाकतील. पण तसं झालं नाही. सगळ्यांनी भीती सोडून द्या. ॲडमिट व्हा. सगळे गर्दुल्ले ॲडमिट झाले तर बाहेर फक्त गर्द विकणारा धंदेवालाच राहील. मग तोसुद्धा म्हणेल की, मी बाहेर राहून

तरी काय करू ? मलाही ॲडमिट करा.'

सगळ्यांनी हसून टाळ्या वाजवल्या. नंदूची नऊवारीतली आई डोळ्यात पाणी आणून आपल्या या तेरा-चौदा वर्षांच्या मुलाकडे कौतुकानं पाहात टाळ्या वाजवत होती.

नंतर वसंत बोलला. खाकी हाफ पँट, चुरगळलेला शर्ट असा वेष. 'पहिल्यांदा पावडरचा खर्च दहा रुपये होता. पुढं वीस रुपये झाला. घरून पैसे मिळंनात तवा दारूच्या भट्टीवर कामाला लागलो. तिथं वीस-पंचवीस रुपये रोज मिळायचा. तो सगळा गर्दमध्येच जायचा. पुढं मालक पैसे देईना. तो गर्दची पुडीच हातावर ठिवू लागला. त्या पुडीसाठी खूप राबवून घ्यायचा. मी बी गुरासारकं काम करायचो. पुडं त्यानं भागेना झालं. मग वस्तीतला एक माणूस म्हणाला, आपण मिळून स्टोअरमध्ये चोऱ्या करू. मग मी स्टोअरमधी चोऱ्या करायला लागलो. मी बारका पोरगा. माझा कुणाला संशय यायचा नाही. पटकन् कशाही खालनं सटकून जायचो. पण पुढं तब्बेत इतकी घसरली की पाऊल टाकवेना झालं. गर्द प्याली की पान्याचा हंडा बी उचलायचो आणि गर्द मिळाली नाही की संडासचं टंबरेल बी उचलता नाही यायचं.'

सगळ्यांनी उत्स्फूर्तपणे टाळ्या वाजवल्या. गायकवाड मला म्हणाले, 'इथं दारु-भट्टीवर कितीही मुलांना काम मिळू शकतं. त्यामुळं या मुलांना गर्दसाठी पैसे मिळवायचा मार्ग पटकन दिसतो.'

सोनावले मामा उठून म्हणाले, 'गर्दवाली पोरं उभी राहा.' सात-आठ-दहा बारकी बारकी पोरं घाबरत घाबरत उभी राहिली. त्यांना आमच्याजवळ आणून उभं केलं. सगळ्यांचे कपडे फाटके. शर्टाला गुंड्या नसल्यामुळे आतल्या छातीची हाडं न् हाडं दिसत होती. धुंदीत असल्यासारखे डोळे. डोळ्यांभोवती काळे आणि डोळ्याखालच्या भागावर सूज आलेली होती. मागे बिहारच्या दुष्काळात भुकेमुळे हाडांचे सापळे झालेली मुलं पाहून धक्का बसला होता, त्यापेक्षा जास्त हादरलो. त्यातला रमेश ढाले नावाचा चार फूट उंचीचा, काटकुळा, दहा-बारा वर्षांचा पोरगा म्हणाला, 'दोन वर्षं मी पावडर पितो. आईपासनं पैसे घेतो. मी बाहेर पडू नये म्हणून मला बांधून ठिवतात. आता बी बांधून ठिवलं होतं. पन मी सोशल वर्करनी बोलावलंय. ॲडमिट व्हायला दहा रुपये लागतात, असं सांगून दहा रुपये घेतले आणि सुटलो.'

पळत गर्दवाल्या बाईकडं गेलो. ती म्हणाली, 'अजून माल नाही आला. संध्याकाळी ये.' मी म्हनलं, 'पन आत्ता नाही मिळाली तर मी काय करू ?' ती म्हणाली, 'संडासात जाऊन जीव दे.' म्हणून वापस आलो, आन या मीटिंगला येऊन बसलो.'

'मीटिंग संपल्यावर काय करणार ?'

'परत त्या बाईकडे जाऊन पावडर घेणार.'

आम्ही सगळे हादरलोच.

आनंदचं गर्दच्या दुष्परिणामांवर सोप्या भाषेत भाषण झालं. शेवटी तो म्हणाला, 'आमच्याकडे सगळ्यांना एकदम ॲडमिट करण्याइतकी जागा नाही. पण आठवड्यातून चार-चार, सहा-सहा लोकांना आम्ही ॲडमिट करून घेऊ. ज्यांना बाहेर पडायचंय गर्दमधनं, त्यांनी आपली नावं बाल वर्ष प्रतिष्ठानकडे नोंदवायची. म्हणजे आम्ही तुम्हाला बरं करून पाठवलं की मग तुम्ही परत व्यसनाकडे वळणार नाही याची दक्षता हे प्रतिष्ठानचे लोक घेतील.'

नाव-नोंदणी सुरू झाली. बघता बघता पंचावन्न नावं नोंदली गेली. एक छोटा मुलगा उभा राहून आनंदला म्हणाला, 'आम्ही ॲडमिट व्हायला तयार आहोत पण सोनावले मामांना सांगा, तुम्ही आम्हाला मारू नका.'

आम्ही हसलो, सोनावले मामाही गालात हसले. हात हलवून म्हणाले, 'बरं. बरं.'

परत येताना पुण्याच्या एका उग्रमतवादी मित्राची आठवण झाली. मी गर्दवाल्यांची माहिती घेतोय असं कळल्यावर तो म्हणाला होता, 'कुठल्या असल्या नॉनइश्यूमध्ये वेळ घालवतोयस.' वाटलं, आता तो आपल्याबरोबर हवा होता.

महिन्यानं परत मुंबईला येतो असं सांगून आनंदचा निरोप घेतला.

० ० ०

महिन्यानं परत मुंबईला आलो आणि डायरेक्ट आनंद नाडकर्णीच्या ओ. पी. डी.त दाखल झालो. तो नेहमीप्रमाणे पेशंट्समध्ये बुडालेला होता. माझ्याकडे पाहून म्हणाला, 'बैस. बरंच सांगण्यासारखं घडलंय मधल्या काळात.'

मी हसून म्हटलं, 'म्हणजे पुलाखालून पाणी का ?'

तोही हसला व म्हणाला, 'हो, तसंच.'

पेशंट्स संपवून शेजारच्या बिल्डिंगमधल्या कॅन्टीनमध्ये गेलो. पांढऱ्या ॲप्रन्समधल्या विद्यार्थ्यांनी, डॉक्टरांनी कॅन्टीन गजबजलेलं होतं. कोपऱ्यावरचं एक टेबल तेवढ्यात मोकळं झालं आणि आम्ही घुसून ते मिळवलं.

आनंद म्हणाला, 'घाटकोपरच्या बॅचेस रेग्युलर सुरू झाल्या. बाल वर्ष प्रतिष्ठानचे लोक त्यांच्या लेटरहेडवर चिठ्ठी देतात. मग आम्ही त्यांना इथं ॲडमिट करतो. कुणी डायरेक्ट आला तरी त्याला तिकडे पाठवतो. दुसरं, इथं

आमच्याकडे बेड्स थोडी असली तरी या ग्रूपमध्ये लहान मुलं असल्यानं पेडिॲट्रिक वॉर्डवाल्यांनी त्यांच्याकडे ॲडमिट करू दिलं, पण त्या पोरांना सॉलिड टर्की आली. एक पोरगं तर इतकं बेभान झालं की ते वॉर्डमधनं पळत सुटलं. भिंतीवरनं उडी मारून रस्ता क्रॉस करून गेलं. त्याच्या मागोमाग मी धावत गेलो. त्याला पकडून परत आणलं. पण आता सगळी गँग ठीक आहे. '

सँडविच खाता खाता म्हणाला, ' त्यानंतर पार्ल्याला एका ठिकाणी मी या विषयावर भाषणासाठी गेलो होतो. नेहमीप्रमाणे मी शेवटी श्रोत्यांना विचारलं, ' तुम्ही काय करणार, बोला. '

' एक बाई उठून म्हणाल्या, या घाटकोपरच्या मुलांना कोसबाडला वसतिगृहात ठेवायचं असलं तर मी प्रयत्न करीन.' दुसऱ्या एक बाई म्हणाल्या, ' देवरुखच्या मातृसेवा मंदिरातही अशा मुलांची सोय करू. ' मी म्हटलं, ' ही छान आयडिया आहे. मुलांना इथून वस्तीत परत पाठवण्यापेक्षा संस्थेत ठेवलं तर चांगली रिकव्हरी होईल. त्यांचं शिक्षणही पुढं चालू राहील. हाफ वे होमसारखंही ते होईल. '

' कोसबाडजवळच दाभोण या गावी रमेश पानसे आणि त्यांचे मित्र ग्राममंगल प्रतिष्ठान चालवतात. त्यांना भेटलो. त्यांनी ट्रायल म्हणून पंधरा मुलं तिथं ठेवायचं कबूल केलं आहे. तशी पहिली बॅच आम्ही पाठवलीसुद्धा. हे या प्रश्नाला नवीनच परिमाण मिळतंय. '

मी म्हटलं, ' पण मुलांचं मोटिव्हेशन कसं होतं ? '

' अरे, ते तर सॉलिड उत्साहात. एक दिवस घरी जाऊन ते नवे कपडे घालून तयारी घेऊन आले. निरोप देताना मलाच धीर देत होते, ' डॉक्टर, तुम्ही आमची काही काळजी करू नका.' दुसरं म्हणजे, महालक्ष्मीची गँग येऊन धडकलीय. म्युनिसिपल चाळीतली स्वीपर्सची पोरं आहेत. तिथल्या दलित पँथरच्या शाखेनं यात पुढाकार घेतलाय. इतकं व्यवस्थित ऑर्गनाइज केलंय की आश्चर्यच. आज दुपारी त्यांना बोलावलंय, त्यांच्याबरोबर आपण तिकडं जायचंय. '

० ० ०





# ७

महालक्ष्मी एरिया म्हटलं की रेसकोर्स, हाजी अली वगैरे पॉश भाग डोळ्यासमोर येतो. त्यात भंगी लोकांच्या चाळी कुठं असतील असं वाटतच नव्हतं. पण महालक्ष्मी स्टेशनवरून उताराने खाली येऊन डाव्या हाताला एका गल्लीत वळलो तसा पॉशपणाचा पडदा दूर होऊन नेहमीचं मुंबईतलं गलिच्छ वातावरण सुरू झालं.

वस्तीच्या सुरुवातीला दहा बाय दहा आकाराची एक दोन्हीकडनं उघडी शेड आहे. तिला आतून सगळीकडे पांढऱ्या टाईल्स लावल्या आहेत. मधूनच साईबाबांची ऑरेंज रंगाची प्रतिमा असलेली टाईल. साईनाथ प्रसन्न अशा अक्षरांच्याही अधूनमधून टाईल्स. खांबाला दलित पँथर, छावणी नंबर अमूक अशी पाटी लटकावलेली.

समोर रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला कोपऱ्यात छोटी त्रिकोणी गार्डन होती. आत हिरवळ, बाजूनं कंपाउंड. पलीकडे सिमेंटच्या तीन मजली पाच–दहा बकाल चाळी.

कट्ट्याकट्ट्यावर, ‘ साईमंदिरा ’त बसलेली मुलं सगळी हीरोटाईप कपडे घातलेली. सगळे मेहतर गुजराथी बोलणारी, उजळ रंगाची. आम्हाला केईएमला घ्यायला आलेला दिनेश सोलिया हा सौम्य चेहऱ्याचा, उंच, अतिशय अदबीनं वागणारा विशीचा तरुण होता. छावणीचा मुख्य प्रेम गोहिल हा तीस–पस्तिशीचा, गोरा, केस उलटे फिरवलेला माणूस होता. त्यांना सगळे आदरानं प्रेमजीभाई म्हणत होते.

आनंद म्हणाला, ‘ तुम्ही आतापर्यंत काय काय केलं ते पुण्याच्या डॉक्टरांना सांगा. ’ ते सगळे हिंदीत बोलू लागले.

दिनेश म्हणाला, ‘ आमच्या वस्तीत दारूचं व्यसन एरवीही मोठ्या प्रमाणावर आहेच. घाणेरडे काम करतात, म्हणून आमच्या वाडवडलांपासून चालत आलेलं आहे. त्याच्यापासून आम्ही लोकांना सोडवायचा प्रयत्न करतो. पण ते फारसं कुणी ऐकत नाही. पण हे गर्दचं व्यसन मात्र अचानक आलं आणि तरुण मुलांमध्ये झटकन पसरलं. याचा खर्च खूप. ही मुलं घरात चोऱ्या करायला

लागली. मित्रांना लुबाडायला लागली. काहींना घरातल्या लोकांनी लाथा घालून बाहेर काढलं. आम्हाला के. ई. एम्.मध्ये याच्यावर ट्रीटमेंट देतात असं कळलं. मंडळाची मिटिंग घेतली. मग आम्ही यांना जाऊन भेटलो. '

आनंद म्हणाला, 'ह्या लोकांचा उत्साह खूप. ह्यांनी एकदम पंधरा- वीसजण आणले. मी म्हटलं, 'वॉर्डात जागाच नाही, काय करू ?' त्यावर ते म्हणाले, 'आम्ही आमच्या वस्तीतल्या गार्डनमध्ये मांडव टाकून कॅम्प करतो, तिथं येऊन तुम्ही ट्रीटमेंट द्या.' मी म्हटलं, 'चांगली आयडिया आहे. पण पेशंट टर्कीत गेल्यावर त्याची सेवा करावी लागते. सांभाळावं लागतं, त्याच्यावर पहारा ठेवावा लागतो.' तर हे म्हणाले, 'आमच्याकडे व्हालंटियर भरपूर आहेत, आम्ही करू.' मग ह्यांनी चक्क इथं कॅम्प केला. आम्ही यांना सांगितलं, आमचे डॉक्टर्स दिवसातनं तीन वेळा येऊन बघून जातील. गोळ्या चालू ठेवा. सीरियस वाटलं तर ताबडतोब टॅक्सीत घालून हॉस्पिटलला आणा. दोघांना टर्की जबरदस्त आली. यांचा फोन आला, आम्ही इमर्जन्सीमध्ये तयारीत राह्यलो. ताबडतोब ट्रीटमेंट दिली. पण तो शुद्धीवर येईपर्यंत मला घाम फुटला होता. पण बाकी सगळं या लोकांनी व्यवस्थित मॅनेज केलं. '

प्रेमजीभाई म्हणाले, 'चला, बागेत या ना, तुम्हाला जागाच दाखवतो. '

आत आलो. एका कडेला स्टुलावर कॅरम बोर्ड ठेवलेला होता. प्रेमजीभाई म्हणाले, 'आम्ही पोरांची इथं सगळी व्यवस्था केलीय. खेळायला कॅरम, पत्ते ठेवलेत. इथं चार चार मुलांना कायम चोवीस तास पहाऱ्याची ड्यूटी लावून दिली होती. त्यांनी पेशंटना नजरेआड होऊ द्यायचं नाही. त्यांना गर्द मिळू द्यायची नाही. त्यांच्या चहापाण्याची, नास्त्याची, जेवणाची व्यवस्था इथं केली होती. '

दिनेश म्हणाला, 'काय सेवा केलीय आमच्या पोरांनी त्यांची. पहिल्यांदा काही तास ठीक होते, खेळत होते. नंतर त्रास सुरू झाल्यावर त्यांना कशाची शुद्ध नव्हती. मुलं जेवण भरवायची. लघवीला, संडासला बिल्डिंगमध्ये न्यावं लागायचं, ते धरून न्यायची. त्यांना पॅंटची बटनं काढायची पण शुद्ध नव्हती. हे सगळं पोरांनी केलं. टर्की संपल्यावर आंघोळी घातल्या. एकेकाची आंघोळ कित्येक महिने झालेली नव्हती. त्यांच्या आईनं केली नसेल एवढी सेवा त्यांनी केली. '

प्रेमजीभाईंनी कंपाऊंडच्या गजांवर अडकवलेल्या चार-सहा मळक्या, फाटक्या, चुरगळलेल्या पॅंट-शर्टांकडे बोट दाखवलं व म्हणाले, 'हे त्या पोरांचे आधीचे कपडे बघा. काय दशा झाली होती. आताचे दाखवू का तुम्हाला ?' असे म्हणून समोरच्या घोळक्यातल्या एकाला हाक मारली. आडव्या पांढऱ्या हिरव्या



पट्ट्यांचा टीशर्ट, खाली ग्रे जीन घातलेला मुलगा लाजत येऊन उभा राहिला. प्रेमजीभाई म्हणाले, 'आठवड्यापूर्वी याला तुम्ही बघायला हवं होतं. '

बागेत सतरंज्या टाकून तिघं-चौघं बसले होते. त्यांच्याकडे बोट दाखवून दिनेश म्हणाला, 'हे तर म्हणतात, आम्हाला इथंच राहू द्या. आम्ही सांगतो घरी जा तरी हे ऐकत नाहीत. खरं तर हे बरे झालेत. पण घरी यांना कुणी विचारीत नाहीत. '

आम्ही बोलत परत साई मंदिरात आलो. मी विचारलं, 'पण या सगळ्याला तुम्ही पैसे कुठून आणले ? '

दिनेश म्हणाला, 'आम्ही लोकांची मिटिंग घेतली. त्यात वर्गणी जमवली. त्याचा हिशोब व्यवस्थित ठेवला आहे. ' त्यानं शेडमधल्या एका लाकडी पेटीतून वही आणून दाखवली. त्यात कुणी किती पैसे दिले त्याची, खर्चाची नोंद होती.

पुढे वही चाळू लागलो.

एका पानावर 'पायरी पहिली ' असं लिहून नाकातनं पाणी, डोळ्यांतून पाणी, मळमळणं, अस्वस्थ वाटणं असं लिहिलं होतं. त्यापुढे तांबडी गोळी एक, हिरवी एक, असं लिहिलं होतं. पायरी दोन असं लिहून त्याच्याही पुढे काही लक्षणं आणि गोळ्या लिहिल्या होत्या. मी आनंदला विचारलं, 'हे काय रे ? '

'यांना टर्कीच्या अवस्था आणि उपचार लिहून दिले होते. गोळ्याही ठेवून गेलो होतो. त्याप्रमाणे बरोबर ते ट्रीटमेंट द्यायचे. '

पुढं पानं उलटली. एकेका मुलाचं नाव पानाच्या डोक्यावर लिहून त्याला काय गोळ्या दिल्या त्याची नोंद त्यांनी त्यांच्या वेड्यावाकड्या अक्षरात केलेली होती.

आणखी पानं उलटली. एकेका नावाखाली १, २, ३, ४ असे आकडे होते. आकड्याच्या खाली छोट्या चार-चार उभ्या रेघा काढल्या होत्या. दिनेशला विचारलं, 'या खुणा कसल्या ? '

तो म्हणाला, 'हजेरीच्या. जे बरे झाले त्यांना घरी सोडलं. पण त्यांनी दिवसातून चार वेळा आपल्याकडं हजेरी दिलीच पाहिजे. त्या त्या तारखेखाली या खुणा करतो. आम्हाला डॉक्टरसाहेबांनी सांगून ठेवलंय, गर्द घेतलंय की नाही ते कसं ओळखायचं ? ' असं म्हणून पेटीतनं टॉर्च काढून दाखवली. 'हा टॉर्चचा लाइट डोळ्यावर टाकला की समजतं, गर्द घेतलीय की काही ते. '

मी हसून आनंदला म्हटलं, 'तू हे बेअरफूट डॉक्टर्स तयार केलेले दिसतात. ' तोही हसला.

सभेची तयारी झाली होती. वस्तीतले बरेच लोक आणून बसवले होते. मी

आनंदच्या कानात म्हटलं, ' या मुलांचा उत्साह खूप आहे. पण कँपमध्ये टर्कीवर उपचार करणं मला धोक्याचं वाटतं. ' तो म्हणाला, ' मलाही तसंच वाटू लागलंय. '

आनंद भाषणात शेवटी म्हणाला, ' आपण हा कँपचा प्रयोग करून पाहिला. त्यावरनं आपण शिकलो. मला वाटतं, टर्की तुम्ही आमच्यावर सोपवा. आम्ही पेशंटला हॉस्पिटलमध्ये टर्कीतनं बाहेर काढू आणि पुढं एकदम त्याला घरी पाठवण्यापेक्षा आठवडाभर तुम्ही त्याला इथल्या कँपमध्ये ठेवा. ते जास्त बरं होईल. '

सगळ्यांनी पटल्याच्या माना डोलावल्या.

सभा संपल्यावर आनंदभोवती पेशंटचा घोळका. प्रत्येकजण त्याला काही काही तक्रारी सांगत होतं. आनंद दिनेशला सांगत होता, ह्याला रात्रीची निळी गोळी वाढव, ह्याला पांढरी गोळी कमी कर. . . वगैरे. दिनेश लागलीच वहीत त्या त्या पानावर पटपट लिहून घेत होता. दुसरा एकजण तशा गोळ्या काढून त्या त्या पेशंटला देत होता.

मला हे दृश्य मोठं हृद्य वाटत होतं. ह्याच मुलांना मी एरवी एखाद्या कोंडाळ्यात पाहिलं असतं तर ती नक्की मवाली वाटली असती.

परत निघाल्यावर सगळे घोळक्यानं आमच्याबरोबर निघाले. गल्लीच्या तोंडापाशी एका बाजूला मोठं शंकराचं देऊळ होतं. दिनेश त्याच्याकडे बघून म्हणाला, 'इथले काही भक्त, बैरागी पहिल्यांदा चिलमीतनं गांजा ओढायचे. आता तेही गर्द पिऊ लागले आहेत. आम्ही त्यांना विचारायला गेलो की गर्दमधनं बाहेर पडायचं असलं तर चला के. ई. एम्.ला. ते माझ्यावर भडकले. म्हणाले, ' ये तो भगवानका परशाद है, कुछ होगा तो भगवान देख लेगा। तुम फिकर मत करो। '

आम्ही हसलो व निरोप घेतला.

° ° °

मध्ये प्रतिमा जोशी भेटली. ती म. फुले समता प्रतिष्ठानच्या वतीने कामाठीपुऱ्यातल्या वेश्यावस्तीत काम करते. मी याच संस्थेत काम करतो. ती म्हणाली, ' आमच्या कामाठीपुऱ्यात काही वेश्या गर्दमध्ये अडकायला लागल्यात. भेटायचंय का त्यांना ? '

मी लगेच हो म्हटलं.

दोनतीन वर्षापूर्वी मी वेश्यांवर लेख लिहिण्यासाठी या वस्तीत खूपदा आलो होतो. त्यामुळे या वेळी आलो तेव्हा सगळे रस्ते, दुकाने ओळखीचे दिसत होते. बाजूंनी मोठ्या, बकाल चाळी, मध्ये गर्दीचे रस्ते. रस्त्याकडेनं गटारं वाहतात.



अशा एका गटाराच्या वर भिंतीत म. फुले समता प्रतिष्ठान अशी पाटी लटकावली होती. खाली कचऱ्यात एक खुर्ची ठेवली होती. बाजूला युसुफ आणि पाचदहा कार्यकर्ते आमची वाट पाहात होते. त्या खुर्चीत मला बसावंसं वाटेना. म्हटलं, ' चला सरळ भेटू गर्दवाल्यांना. '

युसुफ म्हणाला, ' जरा अडचण आहे. गेले एकदोन दिवस पोलिस गर्द घेणाऱ्यांना पकडतात आणि चौकीत नेऊन बेदम हाणतात. '

' का ? '

' ते कुठून गर्द घेतात ते काढून घ्यायला. त्यामुळे सगळ्या गर्दवाल्या घाबरून गेल्यात. मी विचारायला गेलो तर त्यांनी मला टाळलंय. '

प्रतिमा म्हणाली, ' आपण जाऊ तिथे. कुणी एखादी भेटली तरी चालेल. '

आम्ही चालू लागलो. आमच्याबरोबर पाचसहा जण होतेच. ते त्या भागातले छोटे दुकानदार, हातगाडीवाले होते. युसुफ म्हणाला, ' आमच्याकडे गर्दवरनं बराच गोंधळ झालाय काही महिन्यांपूर्वीच. '

' काय ? '

' हाजी मस्तान गर्दच्या एकदम विरुद्ध आहे. त्यांचे शेदोनशे लोक एका रात्री जे चालून आले, तर त्यांनी गर्दचा धंदा करणाऱ्या सगळ्यांना भरपूर चोपून काढलं. त्यानंतर तो धंदा या भागात बंदच झाला. काही महिन्यांनी तो हळूहळू परत सुरू झाला. '

आम्ही अलेक्झांड्रा सिनेमाजवळ येऊन बॉंबे सेंट्रलकडे वळलो. रस्त्यावर घाण पाणी साठले होते. फूटपाथवर पाचपन्नास बाया, पोरं राहात होती. कुठे खाटली होती. कुठं भिंतीलगत कापडं टाकून आडोसे केलेले होते.

एका खाटेवर एक तरुण, सावळी मोठ्या डोळ्यांची मुलगी हातातल्या छोट्या आरशाच्या तुकड्यात पाहात बसली होती. केस धुळीनं भरलेले. अंगावर पुढून टॉवेल होता, तो अगदी काळा वाटावा इतका मळकट होता. आत काहीच नसावं. खाली स्कर्ट होता. प्रतिमा तिच्या समोर जाऊन थांबली. आम्हाला पाहून दचकली, पण धीर दिल्यावर थोडं थोडं बोलू लागली.

तिला दिवसाकाठी पन्नाससाठ रुपयांची गर्द लागतेच. तितके पैसे मिळत नाहीत, तेव्हा रोजच्या टर्कीच्या कळा सोसाव्याच लागतात. तिला व्यसन कसं लागलं ते विचारलं. ती सांगेना. प्रतिमाला ती नंतर हळूहळू सांगू लागली. प्रतिमानं नंतर आम्हाला सांगितलं, ' ही बाई पूर्वी कामाठीपुऱ्यातल्या चाळीत होती. तिचा एक ' आदमी ' आहे. तो पिकपॉकेट करून पैसे मिळवतो. तो या व्यसनात अडकला. मग त्याला कमाई पुरेना, तेव्हा ही बाई त्याला व्यसनाला पैसे देऊ

लागली. तिलाही पैसे पुरेनात. मग घरवालीनं हिला चाळीतनं बाहेर काढून लावलं. आता ती फूटपाथवर येऊन पडली. येवढे होताना हिलाही गर्दचं व्यसन लागलं. त्यामुळे हिचे आणखीच हाल सुरू आहेत. '

आमचं बोलणं ऐकून शेजारी पोराला घेऊन बसलेली वेश्या आली. ती म्हणाली, ' माझा 'आदमी' पण गर्द घेतो. कसा बाहेर काढायचा ? '

मी म्हटलं, ' इथं जवळ नायर हॉस्पिटल आहे. तिथं डॉक्टर राजेंद्र बर्वे आहेत. त्यांना भेटा. ते ॲडमिट करतील. '

प्रतिमा आधीच्या मुलीला म्हणाली, ' तूही का ॲडमिट होत नाहीस ? या बाई उद्या जाणार आहेत, त्यांच्याबरोबर जा. '

शेजारीण लगेच म्हणाली, ' मी जाताना फक्त एकदा तुला विचारीन. आलीस तर ठीक. '

मुलीनं मान हलवली. आम्ही निघालो.

प्रतिमा म्हणाली, 'इथं चाळीत धंदा करणाऱ्या बऱ्याच वेश्यांना हे व्यसन लागलंय, पण त्या बोलत नाहीत. ज्या अशा उघड्यावर येऊन पडल्यात ना, त्याच तेवढ्या कबूल करतात.'

परत कामाठीपुऱ्यातल्या प्रतिष्ठानच्या ऑफिसात मला खुर्चीत बसवलं. चहा मागवला. खुर्चीच्या कडेला कचऱ्याचा घाणेरडा ढीग होता. त्यात काहीतरी हलताना दिसलं. कचऱ्यातले कागद वेचणारा पंधरा-वीस वर्षांचा पोरगा होता तो. धुळीनं माखलेल्या केसांचं नेसतं टारलं झालं होतं. केसांखालचा चेहरा फारसा दिसतच नव्हता. खाली फाटकी, पातळ लुंगी आणि वर नुसता फाटका कोट. आत हाडाचा सापळा. कपडे नुसते कोळशात लोळून यावा तसे काळे. कचऱ्यात कागदाचा तुकडा हाती लागला तसा तो खांद्यावरच्या पोत्यात टाकला आणि दुसऱ्या ढिगाकडे जाऊ लागला. चालताना माणसासारखा ताठ चालत नव्हता तर जनावरासारखा वाकून. पुढचे हात जवळपास जमिनीला टेकतील इतक्या लवून चालत होता.

मी त्याच्याकडे पाहतोय हे पाहून एक कार्यकर्ता म्हणाला, ' वो भी गर्दुल्ला हं, बुलावूं क्या उसे ? "

मला धक्काच बसला. मी हो म्हटल्यावर त्याला त्यानं हाका मारल्या. तो लांबूनच घाबरून आमच्याकडे पाहात राहिला. कार्यकर्त्यानं जरा जोरातच, 'अबे, आव ना इधर, तुझे कोई खाता है क्या?' असं दाटल्यावर तो जवळ आला.

त्याच्या केसांमधनं त्याचे डोळे, भोवतीचं काळं दिसल्यावर हा गर्दुल्ला असावा असं वाटलं. विचारलं,



' किती दिवस गर्द घेतो ? '

' वर्ष–दोन वर्षं. '

' घरी कोण आहे ? '

' कोणी नाही. '

आणखीही काही लोक हा संवाद ऐकायला जमले. त्यातला एक खेकसला, ' क्यूं बे, घरमें कोई नहीं ? झूट बोलता है ? तेरा भाई मुझे मालूम है, वो जिंदा है यहाँ ! ' त्यावर तो पोरगा उलट खेकसला, ' जो अपनेको खिलाता नहीं, उसे भाई कैसे कहना ? '

' अरे गर्दुल्ल्या, तू स्वतः बरबाद होतोस, भावाला का दोष देतोस ? '

मी म्हटलं, ' ते जाऊ द्या. बरं, तू रोजची किती रुपयांची गर्द पितोस ?'

' पचीस. '

' पंचवीस ? हे आणतो कुठून ? '

' साब, सुबह सात बजेसे रातके नऊ बजेतक ऐसा कचरेमें घुमता हूँ. तब पच्चीस रुपया मिलता है। वे सब गर्दमेंही जाते है। '

' मग खाण्यापिण्याचं काय ? '

' साब खाताही नहीं. गर्दके सामने खाने को मनही नहीं होता, भूक भी नहीं लगती. '

' पण काही खायचंच नाही असं किती दिवस चालणार ? '

' बस, इसीमें खतम होने का. '

मला, मी साक्षात मृत्यूशी बोलतोय असं वाटलं.

दुसरा तसाच कचरा वेचणारा पोरगा चालला होता. कार्यकर्ता म्हणाला, 'तो पण गर्दुल्ला आहे. बोलवू का त्याला ? '

मी नको म्हटलं.

युसुफ सांगत होता, ' या भागात अशी गर्दमधे सापडलेली शेकडो मुलं आहेत. '

पुढं काही ऐकायचं बळच राहिलं नव्हतं. सगळ्यांचा निरोप घेऊन निघालो.

° ° °

# ८

एरवी मी या गर्दच्या व्यसनाच्या विषयात येवढा गुंतला गेलो नसतो. पण माझ्या मित्राचाच मुलगा यात सापडल्याचं कळलं आणि घरात असा प्रसंग उभा राह्यल्यावर काय होतं हे जवळून पाहायला मिळालं, त्यातून याचं गांभीर्य जाणवलं.

हा मित्र एस्. आर. पी. या पोलिसखात्याच्या शाखेत आहे. नाव सुरेश. उंच–धिप्पाड, पंचेचाळिशीचा. अतिशय स्ट्रेट फॉरवर्ड आणि कडक म्हणून प्रसिद्ध. बायको अलका. सुस्वरूप, हसरी. त्यांचा मुलगा नितीन. हा अठरा-एकोणीस वर्षांचा, शिडशिडीत, उंच, गोरटेला मुलगा. दोन वर्षांपूर्वी भरपूर पैसे भरून उडुपीला इंजिनियरिंगला घातले. नितीन आणि त्याच्या मावसभावाला घेऊन अलका एके दुपारी आमच्याकडे आली. मावसभाऊ पुण्यात मेडिकलला आहे. अलकाचा इतका पडलेला चेहरा पूर्वी कधीच पाह्यला नव्हता. ती आधी माझ्या पत्नीला, सुनंदाला घेऊन आत बेडरूममध्ये गेली. जरा वेळाने या दोघांनाही आत बोलावलं. बऱ्याच वेळाने ते तिघेही बाहेर आले. अलकाच्या हातात सुनंदाचं प्रिस्क्रिप्शन होतं. अच्छा करून गेलेही. मी सुनंदाला विचारलं, ‘ काय गडबड आहे ? ’

सुनंदा म्हणली, ‘ नितीनला ड्रग्जचं व्यसन लागलेलं आहे. गेलं वर्षभर तो व्यसनात अडकला आहे. ’

मला धक्का बसला. मी विचारलं, ‘ कसलं ? ’

‘ ब्राऊन शुगर म्हणतात ना, त्याचं. ’

माझ्या डोळ्यासमोर लहानपणचा नितीन आला. तो तीनचाकी सायकलवर घरभर फिरून मोटार मोटार खेळायचा. छोटा, गोरा, राजबिंडा, अंगात फक्त मलमलचा शर्ट घातलेला. त्यानंतर हे बरीच वर्ष कुठं कुठं बदलून गेल्यानं गाठभेट नव्हती.

‘ लक्षात कसं आलं ? ’

‘ तो मावसभाऊ आहे ना, त्याच्या लक्षात आलं. ’

मला याचं पुढं काय होणार ह्याची काहीच कल्पना नव्हती. सुनंदा मेंटल हॉस्पिटलमध्ये सायकियाट्रिस्ट आहे. तिला या कामाचा अनुभव असल्यानं तिला

सगळी माहिती होती.

मी विचारलं, ' मग सुटण्याचे चान्सेस किती ? '

' नॉर्मली फार थोडे चान्सेस असतात. पण बघू या. '

सुरेशचा हा एकुलता एक मुलगा. नितीनला मीरा नावाची एक धाकटी बहीण आहे. सुरेशचा घरात सगळ्यांना धाक. अलकासुद्धा त्याला सतत घाबरून असते. त्यामुळे ह्या व्यसनाबाबत सुरेशला सांगायचा तिला धीर होत नव्हता. ती म्हणाली, ' त्याला कळलं तर तो नितूला लाथ मारून घराबाहेर काढील. त्यात हा काही करून बसायचा. '

सुनंदानं अलकाला बजावलं, ' त्याला बेडरूममध्ये ठेवा. बाहेर यायची परवानगी देऊ नको. कोणी मित्र आले तरी घरात नाही म्हणून सांग. हे व्यसनी लोक कुठलाही बहाणा करून बाहेर जाऊन पुडी मिळवतात, किंवा कोणाही मार्फत ती त्या माणसापर्यंत पास करतात. चोवीस तास त्याला डोळ्यांसमोर ठेव. फोनला कुलूप लावून ठेव. तुझ्या मुलीवरसुद्धा विश्वास ठेवू नकोस. कारण तिला दमदाटी करून तो ती पुडी आणायला लावू शकेल. कुठलाही चान्स घ्यायचा नाही. '

रात्रीच्या झोपेच्या गोळ्यांमुळे नितीन सकाळी उशिरापर्यंत झोपला. सुरेशला हे विचित्र वाटलं. त्यानं विचारलं. तसं अलका म्हणाली, ' तो जरा आजारी आहे. '

' मग उठव त्याला. आवरून परत झोपू दे. '

सुरेश ऑफिसला गेल्यावर परत अलकाचा फोन. आम्ही दोघंही तिच्या घरी गेलो. आत नितीन झोपला होता. घर नेहमीचंच. अलकानं उत्तम झाडं वाढवली आहेत. बाल्कनीत इनडोअर प्लँट्सचं मोठं कलेक्शन आहे. दिवाणखान्यातही छान हँगिंग झाडं. सुरेश हा वाइन आणि व्हिस्कीचा शौकिन. एका कोपऱ्यात छान छान आकाराच्या बाटल्यांचा संग्रह. पितळी चकचकीत फ्लॉवरपॉट्स. भारी टॅपेस्ट्रीचे पडदे.

पण आज कशाला रयां नव्हती. या पॉश, व्यवस्थित इंटिरिअरच्या पार्श्वभूमीवर भेदरलेल्या आणि भकास चेहऱ्याची अलका बसली होती. कुणाला ऐकू जाऊ नये म्हणून कुजबुजत बोलत होती. एका रात्रीत तिचे डोळे खोल गेलेले, गालांवर सुरकुत्या आलेल्या दिसत होत्या. अलकाच्या बाबतीत आम्ही नेहमी म्हणायचो, आपल्याला माहीत असल्यापासून ही अशीच आहे. हिचं वय वाढत नाही. पण आज मात्र तिचं वय खाड्कन दहा वर्षांनी वाढलेलं दिसलं.

' आता झोपलाय, पण मधूनच उठून तो असं काही करतो की मला भीती



वाटते. त्याचा चेहरा पाहवत नाही. काहीतरी बोलतो, पण बोलणं समजत नाही. त्याला मी तुझं नाव सांगून परत झोपवते. पण मीरा शाळेत गेल्यावर तो आणि मीच. मला ढकलून तो बाहेर गेला तर मी कशी आवरणार ? मी शेजारच्या बाईंना विश्वासात घेतलंय. त्यांना सांगितलंय की मी ओरडले तर मदतीला या. अग, यानं गळा दाबला तरी कुणाला पत्ता लागायचा नाही. '

' सुरेशला सांगितलं का नाही ? '

' अग, धीरच होत नाही. तो नितीनला काय करेल ही एक भीती, परत स्वतःचंही काही करून घ्यायचा. त्याचा संताप तुला माहीतच आहे. त्याचं ब्लडप्रेशर वाढलं तर मेंदूतली शीरबीर तुटायची भीती. '

सुनंदा म्हणाली, ' पण त्याला मी सांगते. एक कारण म्हणजे तुझ्यावर दोन्हीकडनं ताण पडतोय. तुला स्वतःला सांभाळायला पाहिजे. '

' मग निदान त्याला सांग की आता आता नितूनं घ्यायला सुरुवात केली होती. . . '

' त्याला मी स्पष्ट, सर्व ते सांगणार. काही होणार नाही. तू घाबरू नकोस. '

मी विचारलं, ' वर्षभरात नितीन दोनदा मोठ्या सुट्टीला घरी आला. तुला कधी संशय नाही आला ? '

' माझे पैसे चोरीला गेले तेव्हा मला नितीनचा संशय आला. पण बोलले तर सुरेशची भीती. सुरेशचे एकदा पैसे गेले तेव्हा त्यानं मला विचारलं. मी सांगितलं, तुझाच हिशोब चुकला असेल काहीतरी. '

दुसऱ्या दिवशी सुनंदानं सुरेशला सर्व काही सांगितलं. म्हणाली, ' यावर नेहमीसारखी डोक्यात राख घालू नकोस. अलकाला दोष देऊ नकोस, नाहीतर ती कोलमडेल. तुम्हा दोघांच्या मदतीची या क्षणी नितीनला अतिशय गरज आहे. '

तो ठीक आहे म्हणून गेला.

नंतर अलका सांगत होती, 'सुरेशनं त्याचे ऑफिस, स्पोर्ट्सचे सगळे कार्यक्रम रद्द केले. फोनजवळच्या सोफ्यात तो राखणीला बसलाय तो उठलाच नाही. रात्री नितूवर लक्ष ठेवण्यासाठी तो बेडरूममध्ये बसून राहतो, मला झोपायला लावतो. मला कधी जाग आली की मग तो झोपतो. '

अलकाचे नातेवाईकही आमचे मित्र. त्यांचंही आमच्याकडे येणंजाणं. अलकानं बजावलं होतं की त्यांना यातला एक शब्द कळू द्यायचा नाही. बरं, ह्या नातेवाइकांना काहीसा संशय होताच. ते आम्हाला विचारायचे, नितीनला नेमकं काय झालंय ? आम्ही सांगायचो, ' जाँडिस झालाय. '

नितीनचे मित्र त्याच्या घरी घिरट्या घालू लागले होते. गेले महिनाभर तो सुट्टीला इथं असल्यानं ते याचे सुट्टीतले मित्र होते. नितीन परत उडुपीला गेलाय म्हणून अलका त्यांना परतवून लावत होती. ' असा कसा आम्हाला न सांगता गेला ? ' असं ती मुलं खोदून खोदून विचारायची. एक मित्र तर रात्री उशिरा आला होता. पण सुरेशचा उग्र चेहरा पाहून पळून गेला.

नंतर नितीननंच सांगितल्यावरून कळलं की तो त्या मुलांना पावडर आणून द्यायचा. त्याच्यावर ती अवलंबूनच होती. दोनचार दिवसांनी त्यांनी दुसरी व्यवस्था शोधून काढली असणार, कारण ते यायचे एकदम बंद होऊन गेले.

नितीनला घरातच ' ॲडमिट ' केल्यानंतर दोन दिवसांनी मला आणि सुनंदाला मुंबईला जायचं होतं. कार्यक्रम आधीच ठरलेला होता. मुंबईत सकाळीच आम्हाला अलकाचा घाबरलेल्या आवाजातला फोन : ' काल रात्री नितूनं बाल्कनीतनं तिसऱ्या मजल्यावरनं उडी टाकली. पण फारसं लागलं नाही. चेहऱ्याला थोडं खरचटलं आहे. नेहमीच्या डॉक्टरांकडून ड्रेसिंग करून घेतलं आहे. '

आम्ही परतल्यावर सुरेश सांगत होता, ' रात्री साडेदहापर्यंत आम्ही त्याच्या खोलीत होतो. तो शांत झोपलेला पाहून आम्ही आमच्या बेडरूममध्ये गेलो. तेवढ्यात अकराला त्यानं हे केलं. लगेच वर आला, बेल दाबली. मी दार उघडलं तसा हा रक्तबंबाळ अवस्थेत समोर उभा. तुला खरं सांगतो अनिल, तुझा विश्वास नाही या गोष्टींवर मला माहीत आहे, पण आमच्या महाराजांच्या कृपेनंच तो वाचला. '

सुरेश कोल्हापूरच्या एका महाराजांचा भक्त. हे हयात आहेत. नितीनच्या बेडरूममध्ये कोपऱ्यात मोठा लाकडी देव्हारा आहे, त्यात त्या महाराजांचा फोटो आहे. रोज त्याची पूजाअर्चा चालतेच.

सुरेश म्हणाला, ' तो ज्या दारातनं उडी टाकायला गेला ना, त्याच्या जवळच महाराजांचा फोटो आहे. तो तिथूनच गेला, महाराजांनी त्याला पाहिलं म्हणून तो वाचला. नाहीतर तीन मजल्यावरनं उडी टाकणारा मुलगा वाचेल का ? '

नंतर सुनंदा आणि मी घरी आल्यावर यावर बोलत असताना सुनंदा म्हणाली, ' इतक्या दिवस तो त्या बेडरूममध्ये महाराजांच्या फोटोसमोर बसून ही पावडर ओढत असायचा, तेव्हा का नाही महाराजांनी वाचवलं ? '

नितीनच्या चेहऱ्यावरचं लागलेलं पाहिलं. तो ड्रग मिळवण्यासाठी पाईपवरनं उतरताना शेवटी शेवटी थोडा घसरून पडला असणार. शिवाय त्याला औषधं जी चालू होती त्यामुळे उतरताना चक्करही येणं शक्य होतं. तोंडावर



डोळ्याजवळची सूज तर मला त्यानं एखादा ठोसा खाल्ला असण्याचीच वाटत होती. बहुधा त्या परिस्थितीत तो जवळच्या अड्ड्यावर गेला असणार. पैशाअभावी त्याला कुणीतरी मारून हाकललं असणार. पण हा संशय आम्ही बोललो नाही. कारण सुरेश आणि अलका नितीन वाचल्याच्या समाधानात होते.

नितीन हळूहळू बाहेरच्या खोलीत येऊन बसू लागला. तो चित्रं चांगली काढायचा, त्याला आम्ही चित्रं काढ असं सुचवलं. दोनचार चित्रं काढल्यावर तो कंटाळला. मी जाऊन त्याला ' ओरिगामी ' शिकवली. ती तो बराच वेळ करीत बसायचा. सुरेश रोज संध्याकाळी टेनिस खेळायला जायचा. सुनंदानं सांगितलं, ' तेवढा वेळ नितीनला बरोबर घेऊन जात जा. '

एका संध्याकाळी नितीनला फिरायला नेलं. बऱ्याच गप्पा झाल्या. एरवी त्यांच्याकडे कधी गेलो की त्याच्या आईवडलांशीच आमच्या गप्पा व्हायच्या. हा कधीतरी बाहेर यायचा. ' हाय ' करायचा. आम्ही म्हणायचो, ' नितू किती मोठा झाला ! केवढासा होता. ' तो हसून बाहेर निघून जायचा. मध्ये एकदा कँपमध्ये मेन स्ट्रीटवर नितू दिसला होता. पार्क केलेल्या स्कूटरवर बसून सिगरेट ओढत होता. मला पाहिल्यावर त्याने सिगरेट लपवली. त्याला ऑक्वर्ड होऊ नये म्हणून मीही त्याला न पाहिल्यासारखं करून पुढं गेलो. मनात तेव्हाच ठरवलं की परत नितू भेटल्यावर त्याला सांगायचं, माझ्यासमोर सिगरेट ओढली तरी चालेल. नंतर या ट्रीटमेंटनंतर मी त्याला या प्रसंगाची आठवण करून दिली, तेव्हा नितू संकोचानं म्हणाला, ' तेव्हा मी ब्राऊन शुगरची सिगरेट पीत होतो. तुम्च्या ते लक्षात आलं की काय म्हणून जाम टरकलो होतो. '

फिरता फिरता मी विचारलं, ' व्यसनाची सुरुवात कशी झाली ? '

तो म्हणाला, ' होस्टेलवर. इंजिनियरिंगला तिकडं ग्रुप्स असतात. रॅगिंग असतं. सीनियर पोरं न सांगता खाण्यातनं, सिगरेटमधनं भांग, गांजा घालून ज्युनियर पोरांची मजा बघत बसतात. शिक्षा म्हणूनसुद्धा ओढायला लावतात. एखादा सोवळा पोरगा असेल तर त्याला खूप चिडवतात, छळतात. तिथं भारतातल्या निरनिराळ्या प्रांतांतनं पोरं येतात. मुलूख नवा, त्याच्यापूर्वी होस्टेलला कधी राहिलेले नसतात. त्यात हे सगळे प्रकार. काही पोरं तर लाख लाख रुपये भरलेले असूनही चक्क कॉलेज सोडून जातात. पहिल्या परीक्षेचं टेन्शन फार असतं. तिच्यात पास झालं पाहिजे, चांगला स्कोअर झाला पाहिजे तरच आपल्याला पाहिजे ती लाईन मिळणार. बरं, सारख्या टेस्ट्स चाललेल्याच असतात. याच्यापैकी कुठल्यातरी काळजीने व्यसन लागतंच. सिगरेट ओढत नसला तर इतर पोरं त्याला बुळ्या म्हणतात म्हणून तो सिगरेट तर हमखास

प्यायला लागतो. मला पोरं म्हणायची, ' सिगरेट तर कुणीही ओढतं. हशीश कधी टेस्ट केलाय का ? त्याच्यासारखी कुठली ' ट्रीप 'च नाही. आहे का हिंमत ? ' दोनचारदा ऐकून घेतलं. एकदा इर्षेपायी भसाभसा हशीशवाली सिगारेट ओढून दाखवली. त्याची पुढं सवय लागली. मग पुढं ' स्मॅक ' (गर्द) आली. तीही टेस्ट केली. पण तेव्हा स्मॅक कंट्रोलमध्ये घ्यायचो. आठवड्यातनं एखाद्या वेळी. मध्ये सोडलीही होती. पण हळूहळू परत सवय लागली. त्या काळात आम्ही पाचगणीला दोस्तलोक ट्रीपला आलो. मी रोज एस्. टी.ने साताऱ्याला येऊन स्मॅक मिळवायचो आणि परत जायचो. '

' साताऱ्याला त्या वेळी गर्द मिळायची ? '

' अगदी रेग्युलर. मी ते ठिकाण बरोबर शोधून काढलं होतं. '

' व्यसनासाठी पैसे कसे उभे करायचा ? '

'सगळी फी त्यात वापरली. कॉलेजला बसलोच नाही. पण तेही पुरेनात. तिथं एका वर्कशॉपमध्ये कामाला लागलो. त्यातनं पैसे उभे करायचो. घरी या सगळ्याचा पत्ताच नव्हता. पण सुट्टीत पुण्याला आलो त्या दीड महिन्यात ते भलतंच वाढलं. इथलं पावडर मिळायचं ठिकाण शोधून काढलं. कँपातलं शिवाजी मार्केट आहे ना, तिथं एक माणूस पावडर सप्लाय करायचा. माझ्यासारखे बरेचजण तिथं जमलेले असायचे. तो माणूस पैसे घेऊन जायचा आणि बऱ्याच वेळानं पावडर आणून द्यायचा. आम्ही एक वाजल्यापासून तिथं पैसे देऊन बसायचो. तो चार वाजता माल घेऊन यायचा. कधी कधी तर सहा साडेसहासुद्धा वाजायचे. तो माणूस मुख्य अड्ड्यावर जायचा, प्रत्येक पुडीतली थोडी थोडी पावडर काढून घ्यायचा. स्वतः ओढायचा आणि नंतर इकडं आणून द्यायचा. नंतर मग मी मेन अड्डा शोधून काढला. तिथं अश्पाक नावाचा मुसलमान पोरगा आणि राजू नावाचा मराठा पोरगा होता. जाऊन जाऊन ओळख झाली. शिवाजी मार्केटमध्ये ज्या रेटनं पावडर मिळायची त्याच्या निम्म्या रेटनं तिथं मला मिळू लागली. '

' तुझी–त्यांची दोस्ती व्हायचं काय कारण ? '

' जाऊन जाऊन झाली. एकदा अश्पाकला ताबडतोब अडीचशे रुपयांची गरज होती. त्याला कुठल्या तरी सेफ ठिकाणाहून पैसे हवे होते. त्याच्या गिऱ्हाइकांकडनं घेतले असते तर मागाहून त्यांनी याचा गैरफायदा घेतला असता. पुढं कधी पैसे नसताना याच्याकडे पावडर मागितली असती. पण माझ्याकडे पैसे



मागणं त्याला सेफ वाटलं. त्या वेळेला खिशात होते म्हणून मी पटकन दिलेसुद्धा. आमचं रिलेशन जमून गेलं. माझ्याकडे कधी जास्त पैसे आले तर मी त्याच्याकडे ठेवायला द्यायचो. मी कधीही गेलो तर हॉटेलमध्ये जाऊन चहा पाजल्याशिवाय ते दोघं कधी सोडायचे नाहीत. जेवायचाही आग्रह करायचे. कितीतरी वेळा जेवायला घातलंय. अश्पाक तर मला नेहमी म्हणायचा, 'तू हे खराब व्यसन सोडून दे. कशाला बरबादी करून घेतो स्वतःची ? '

' अश्पाकला स्वतःला हे व्यसन नव्हतं का ? '

' छेःछेः या धंद्यातली माणसं, अगदी नाइनटी नाइन परसेंट, पावडरला हात लावत नाहीत. अश्पाकची रिक्षा आहे. त्याला पैशाची गरज होती म्हणून तेवढे दीडदोन महिनेच या धंद्यात तो पडलेला होता. पण नंतर नंतर तो म्हणू लागला, कसले सुशिक्षित सुशिक्षित लोक यायला लागलेत ! एक सिंधी फॅमिली कारमधनं येते माल न्यायला. त्या घरातल्या तर पुरुषांना, बायकांना सगळ्यांना व्यसन लागलंय. लोकांची बरबादी पाहावत नाही. त्याचं पाप आपल्या डोक्यावर नको म्हणून त्यानं शेवटी धंदा बंद करून टाकला. '

' इथल्या कॉलेजच्या ग्रूपमध्ये तू कधी सामील झालास ? '

' मी पुण्यात आधी दोन वर्षं होतो, तेव्हाचा ग्रूप सगळा सुटला. त्यांच्यात कुणी व्यसनी नव्हतं. त्यांना मी पावडर घेतो कळल्यावर त्यांनी मला सॉलिड झापलं. घरी येऊन व्यसनाबद्दल सांगायचा दम दिला. एक दोस्त तर त्यासाठी घरी आलाही होता. आई आतमध्ये काम करत होती. आम्ही हॉलमध्ये बसलो होतो. त्यानं ' आँटी ' म्हणून हाक मारली. पण मी असा काही चेहरा आणि हातवारे केले की आई बाहेर आली तरी त्यानं ते सांगितलं नाही.आयत्या वेळी दुसरंच काहीतरी सांगितलं. आमच्या ग्रूपमध्ये जाधव नावाचा सीनियर मेंबर आहे. त्याचं आम्ही सगळे ऐकतो. बॉडीनंही मजबूत आहे. त्यांनी मला व्यसन सोडण्यासाठी कानफटातसुद्धा ठेवून दिली होती. मी त्यांच्यासमोर सोडतो म्हणून कबूल केलं. पण नंतर त्यांच्या लक्षात आलं की तरीही पावडर घेतोच आहे. मग त्यांनी माझा नादच सोडून दिला. मग पुढं मी ब्राऊन शुगरवाल्यांमध्येच बसू लागलो. '

' त्यांनी तुला सामावून कसं घेतलं ? '

' त्यांना कळलं की मला भवानी पेठेतनं पावडर निम्म्या दरात मिळते. त्यामुळे तेच माझ्या मागे मागे असायचे. मी सकाळी आंघोळबिंघोळ करून साडेआठ नऊला कॉलेजवर जायचो. तोपर्यंत ही पोरं माझी डेस्परेटली वाट पाहात बसलेली असायची. मी आल्या आल्या म्हणायचे, ' नित्या, ही स्कूटरची चावी. पेट्रोल भरून ठेवलंय. हे पैसे. आमचा स्टॉक आण, तुझाही स्टॉक त्यातनंच घे.

ताबडतोब पळ. आम्ही लेक्चरला बसतो. मागच्या खिडकीतनं स्टॉक पास कर.'

'तू किती लोकांना व्यसन लावलंस ?'

'तसं मी केलं नाही. एका मुलाच्या बाबतीत असं झालंय की तोच माझ्या मागं लागला होता, 'मला ट्राय करायचीय पावडर एकदाच.' नेहमी म्हणायचा. पण मी लक्षच द्यायचो नाही. एकदा हॉटेलात आम्ही बसलो होतो, तेव्हा तो हेच म्हणाला. त्या दिवशी माझ्याकडे नेमके पैसे नव्हते माझ्याच स्टॉकसाठी. मी म्हटलं, 'चल काढ पैसे, मी आणून देतो.' त्यानं पैसे दिले. मी आणून दिलं. येवढं एकदाच माझ्या हातनं हे घडलंय.'

'पुढं मग त्या मुलाचं काय झालं ?'

'तो पुरता अडकलाय त्यात. आता तर कुठंही पडलेला दिसतो.'

'कोण आहेत ही पोरं ? आईबाप कोण आहेत त्यांचे ?'

'काही बड्यांची आहेत तर काही अगदी साधारण परिस्थितीतली. एका मुलाचे वडील एक बडे पुढारी आहेत. ते पोरगं तर इतकं वाया गेलं की बस्स. एकदा आमच्या ग्रूपपैकी एकाला तो म्हणाला, 'काहीही करून आत्ता मला पैसे दे. पाहिजे तर मी माझी बहीण तुला देतो.' त्यावर आमच्या जाधवने त्याला चांगलंच फटकून काढलं. त्याचे वडील स्वतः कॉलेजवर येऊन बसायचे. तेव्हा हा येईनासा झाला. ते यायचे बंद झाले तसा परत घ्यायला लागला.

'दुसरा एक पोरगा आहे, धारवाडकर. त्याचे वडील दिल्लीला असतात. केंद्रीय मंत्रालयातले मोठे अधिकारी, इंजिनियर आहेत. हा पोरगा व्यसनात गेले वर्षभर बुडालाय. पण वडलांना पत्ता नाही. परवाचं सांगतो, वडील इथल्या याच्या खात्यात सहा हजार रुपये ठेवून गेले. एका महिन्यात याने आणि याच्या मित्रांनी ब्राऊन शुगरमध्ये संपवले. परत वडील आले. ह्याने पैसे मागितले. वडलांनी विचारलं, येवढे पैसे संपले कसे ? तर हा म्हणाला, 'होस्टेलच्या जेवणाचा कंटाळा आला होता म्हणून चांगल्या हॉटेलात सकाळ–संध्याकाळ जेवत होतो.' वडील म्हणाले,'ठीक आहे.' आणि जाताना परत तीन हजार रुपये ठेवून गेले.

'तुला हे सोडावं असं कधी वाटलं ?'

'एकदा मुंबईला गेलो आणि जवळचा स्टॉक संपला. मग त्रास व्हायला लागला. मी आणि मित्र सायनला होतो. आम्हाला कुठे मिळते त्याची जागा माहीत नव्हती. तेवढ्यात एकजण गर्द ओढणारा चेहऱ्यावरून वाटला. त्याला परिस्थिती सांगितली. तो म्हणाला, 'इथं मी प्रयत्न करून बघतो.' म्हणून तो चक्कर मारून आला. म्हणाला, 'मला पाहून इथं कुणी थांबत नाही. आपण कांदिवलीला जाऊ.



तिथं तुम्हाला मिळवून देतो.' मला वाटलं, हा दादा टाईप दिसतोय, म्हणून याला इथले घाबरत असतील. कांदिवलीला एका बाईच्या धंद्यावर त्याने आम्हाला नेलं. आमची गरज पाहून तिनं आम्हाला दीडपट रेट सांगितला. आमच्याबरोबर आलेल्या माणसाने कमी रेटमध्ये दे सांगितलं. ती बाई ऐकेना. तेव्हा त्याने शर्ट वर करून दाखवला. तर आत पोलिसचा बक्कल नंबर असलेला पट्टा! त्या बाईने घाबरून पुड्या देऊन टाकल्या. आम्हीही टरकलो. पण बाहेर आल्यावर तो पोलिस म्हणाला, 'घाबरू नका. मी पण या व्यसनात सापडलो होतो. नुकताच हॉस्पिटलमधनं ट्रीटमेंट घेऊन बाहेर आलोय. माझ्यासारखे बरेच पोलिस अजूनही या व्यसनात सापडलेत. बाहेर कुणी बोलायला तयार नाही, कारण नोकरी जाईल अशी भीती. बरं, पोलिस असल्याने माल इकडे तिकडे मिळत राहतो. त्यामुळे व्यसन वाढायला उशीर लागत नाही. तुमचा चेहरा पाहिल्यावर तुमची अवस्था पाहिली. मला हे दुखणं माहीत आहे म्हणून इथपर्यंत मी आलो. पण चांगल्या घरचे तुम्ही दिसताय, तुम्ही या खराब व्यसनात राहू नका.' त्यानंतर मी हळूहळू कमी करायला लागलो. आणि शेवटी घरी कळलं तेव्हा मग पूर्णच सोडायचं ठरवलं.'

नितीन गेले महिनाभर घरात बसून बसून कंटाळलेला होता. तो सारखा विचारायचा, 'मला आता बाहेर कधी सोडणार ?' आताही तसे विचारले. मी म्हटलं, 'तुझे जुने दोस्त तुला सामावून घेतील का ?'

'अरे, त्यांना तर मी व्यसन सोडलंय कळलं ना तर फारच आनंद होईल. सेलेब्रेटसुद्धा करतील.'

'मग असं कर, सगळ्यांना घरी बोलव. आईसमक्ष तू कसा व्यसनात अडकलास आणि त्यातनं बाहेर आलास हे सांग. म्हणजे त्यांचीही खात्री पटेल.'

तो अक्षरशः एक्साईटच झाला. म्हणाला, 'आजच सगळ्यांना सांगून येऊ का ?'

'थांब, जरा दमाने घे. एखाद्या रविवारी सगळ्यांना सोईने बोलव.'

आम्ही त्याला घरी सोडायला गेलो. अलका वाटच बघत होती. चेहऱ्यावर गेल्या महिन्यात पडलेला ताण दिसत होता. भेटल्याभेटल्या त्याने आम्ही त्याला बाहेर पडायला परवानगी दिल्याचं सांगितलं आणि मोठ्या माणसाच्या, विशेषतः सुरेशच्या टोनमध्ये म्हणाला, 'आणि आता काळजी करणं कृपा करून सोडून द्या. मी परत तिकडे जाणार नाही.'

आम्ही त्याची पाठ थोपटून निरोप घेतला. त्याची आईसुद्धा तिच्याहून उंच झालेल्या पोराकडे कौतुकाने पाहातच राहिली.

नंतर दहापंधरा दिवसांनी नितीन मुंबईला मावसभावाकडे राहायला म्हणून गेला. तिथून जळगावला मामाकडे गेला. महिना दोन महिने फोन आला नाही. परवा दुपारी घरी आला. चेहरा फ्रेश झाला होता. डोळ्याभोवतीचं काळं बरंच पुसट झालेलं होतं. वजन चांगलं वाढलेलं दिसलं.

मी विचारलं, ' काय, कसं काय ? '

तो म्हणाला, ' फर्स्ट क्लास. '

' पावडरची कधी आठवण झाली होती का ? '

' छे: बिलकुल नाही. ते संपलं सगळं. कालच कॉलेजवर गेलो होतो. सगळे भेटले. '

' पावडर घेणारे दोस्त कसे आहेत ? '

' ते सगळे तसेच आहेत. आईने त्यांच्या घरी माहीत नसेल म्हणून निनावी पत्रं पाठवली होती. दोनदा पाठवली. पण परिणाम काही दिसत नाही. पालकांनी येऊन त्यांना नेलेलंही नाही, आणि चौकशीही केली नाही. पण त्यांच्यात गेलोच नाही. जुन्या ग्रूपमध्ये गेलो. सगळ्यांना खूप आनंद झाला. आता मला मुलीसुद्धा ' हाय ' म्हणू लागल्यात. '

सांगताना जरा लाजल्याने आम्हा दोघांनाही हसू आले.

० ० ०





# ९

पुणं.

हे माझं शहर. इथं निरनिराळ्या थरात माझे मित्र आहेत, मी रोज पाचपन्नास लोकांना भेटत असतो. तरीही गर्द नावाचं व्यसन इथं आलंय, आणि ते पसरतंय याची मला कुणकुणही लागली नाही. मुंबईला आनंद नाडकर्णीबरोबर फिरल्यावर मला पुण्यातही अशी गर्दवाली मुलं बघताक्षणी ओळखू येऊ लागली. मी एकदा एका हॉटेलमध्ये गेलो. सकाळी अकराच्या सुमारास. आतल्या टेबलाटेबलांवर जे मुलांचे कंपू बसले होते त्यांतली कितीतरी मुलं मला ओळखू आली. ही बहुधा समोरच्या किंवा आसपासच्या कॉलेजांमधली मुलं असणार. माझ्या मित्राचा मुलगा कॉलेजात आहे. त्यानं सांगितलं, 'ही पोरं इतरांमध्ये मिसळत नाहीत. त्यांच्या त्यांच्यातच ते चाललेलं असतं. कोणाला त्यांचा त्रास नसतो. आमच्या होस्टेलवर मणिपुरी पोरं आहेत ना, त्यांनी हे व्यसन आमच्याकडे आणलं.'

'कुठल्या कुठल्या कॉलेजांमध्ये हे पसरलंय?'

'पूर्वी अशा व्यसनांमध्ये वाडिया कॉलेज पुढं असायचं. कारण तिथं फिरंग्यांची संख्या जास्त. पण आता फर्ग्युसनने त्यांना मागं टाकलंय. पूना कॉलेजला इराणी, आफ्रिकन्स मुलं खूप. तिथंही हे व्यसन पसरलंय. त्यांच्या बाबतीत आणखी प्लस पॉईंट म्हणजे त्यांच्या कॉलेजच्या समोरच्या भागातच पुण्यातला गर्दचा मोठा धंदा चालतो.'

'पण आपली इथली मुलं त्यात सापडतात, ते व्यसनाला पैसा कुठून आणतात?'

'ज्यांना मिळत नाही ना, ते आपापल्या रूम्सवर अक्षरशः टाचा घासून पडून राहतात.'

मेन स्ट्रीट हा पुणे कँपातला मुख्य रस्ता. इथं सगळं इंग्रजाळलेलं वातावरण. पूर्वी पारश्यांची, ख्रिश्चनांची इथं सद्दी होती. आता सिंधी-पंजाब्यांची. या रस्त्यावर शहरापेक्षा वेगळी माणसं दिसतात. व्हिडिओ गेम्सच्या दुकानासमोर इराणी-अफ्रिकनांची गर्दी उसळलेली असते. एकदा रात्री आठला मी या रस्त्यावर गेलो होतो. सहज म्हणून फिरायला. खाली विटलेल्या जीनची पँट, वर तसलंच

जर्किन. मध्ये टी शर्ट. त्याच्यावर ' आय लव्ह अमेरिका ' या टाईप वाक्यं छापलेली. काही परदेशी विद्यार्थी तर बरेचसे इथले. दृष्टीस पडता क्षणी ते ॲडिक्ट आहेत हे ओळखायचो.

दुकानं बंद होऊ लागली. ही मुलं रस्त्यावर पार्क केलेल्या स्कूटर्स, मोटरसायकल्सवर किंवा बंद झालेल्या दुकानांच्या ओट्याओट्यांवर बसून गप्पा मारत होती. त्या रस्त्यावर मिळून शेसव्वाशे तरी अशी मुलं असतील. कशाची तरी ते वाट पाहात असावेत. साडेआठच्या सुमारास काहीतरी एकदम हालचाल सुरू झाली. ' स्टॉक ' आला या अर्थाची कुजबूज ऐकू आली. काही वेळात स्कूटर्स, इंड–सुझुकी, हिरो होंडा धाडधाड चालू झाल्या आणि रस्ता पूर्ण रिकामा होऊन गेला.

याच रस्त्यावर एकदा स्कूटरवर एक तरुण ॲडिक्ट मुलगा बसलेला आणि त्याच्यासमोर स्कर्ट ब्लाऊज घातलेली, गोरी, लांब केस पाठीवर सोडलेली मुलगी उभी होती. तो खाली मान घालून ऐकत होता. ती मुलगी अतिशय पडलेल्या चेहऱ्याने काहीतरी बोलत होती. ती त्याची मैत्रीण असेल किंवा बहीणही असू शकेल. पण वाटलं, मी इतक्या लांब असूनही ती काय बोलत असेल हे सांगू शकेन. कारण इतकं ते ठरलेलं आहे.

कँपातल्या एका कोपऱ्यावर उसाचे प्रसिद्ध गुऱ्हाळ आहे. एक रुपयात भला मोठा ग्लासभर उत्तम रस मिळतो. म्हणूनं तिथं मी अधूनमधून जात असतो. परवा गेलो तर दिसलं तिथं ॲडिक्टसूचीच मोठी गर्दी. नंतर बऱ्या झालेल्या एका ॲडिक्टने सांगितलं, ' गर्दपायीच सगळे पैसे जातात. खायला प्यायला काही उरतच नाहीत. मग आम्ही स्वस्त, पण चांगलं जिथं काही मिळतं अशी ठिकाणं शोधून काढायचो. हे जसं रसाचं गुऱ्हाळ, तसं बंडगार्डन समोरची भेळेची गाडी आहे. काही पाव, भजी, वड्याच्या गाड्या आहेत. तिथं थोडंफार पोट भरून घ्यायचो. '

° ° °

पुण्यात डॉ. विद्याधर वाटवे नावाचा सायकियाट्रिस्ट मित्र आहे. बी. जे. मेडिकल कॉलेजला मला तीन वर्षं ज्युनियर होता तेव्हापासूनची याची माझी ओळख. हा थिएटर ॲकॅडमीच्या नाटकात कामं करतो. वाटवे ड्रग्जच्या केसेस ट्रीट करतो हे कळल्यावर त्याला भेटलो. त्याने त्याच्या काही पेशंटचे पत्ते दिले; त्यांना मी येऊन भेटणार असल्याचे निरोपही पाठवले.

शिवाजीनगरमधली एक चाळ.



या चाळीतल्या वरच्या एका खोलीत मी विद्यार्थी असताना राहिलोही होतो. पडगिलवार नावाचं कुटुंब तिथं राहतं. एका छोट्या खोलीचा संसार. पन्नाशीची विधवा आई स्टोव्हवर पोळ्या करीत होती. कॉलेजमधली तरुण मुलगी काहीतरी काम करीत होती. अरुण नावाचा मुलगा स्टुलावर मान खाली घालून बसलेला.

' मी विचारलं, ' कसं काय लागलं व्यसन ? '

' मित्रांमुळं. '

आई म्हणाली, ' या चाळीत चारपाच जण आहेत ही वस्तू घेणारे. त्यांच्या नादाने हाही घेऊ लागला. '

तेवढ्यात खिडकीतनं एका पोराने डोकावून पाहिलं. आई मोठ्याने म्हणाली, ' शिऱ्या, आत ये. ' तो चुळबुळ करीत आत येऊन बसला. म्हणाली, ' हा बी त्यातलाच. ' तो परत उठून जायला लागला तशी आई म्हणाली, ' अरे डाक्टर हायेत ते. पोलिस नाहीत. '

मी विचारलं, ' तुला कुणामुळे लागलं व्यसन ? '

तो म्हणाला, ' आमच्या वाड्यात एक ट्रक ड्रायव्हर आहे. तो बरेच दिवसांपासून ही गोष्ट घ्यायचा. मला एकदा म्हणाला, ' मार दम. काही होत नाही. ' मी घ्यायला लागलो. '

अरुण म्हणाला, ' सुरुवातीला तर मला उलट्याच झाल्या. पाच-सहा वेळा घेतलं आणि सोडून दिलं. मग दहाबारा दिवस मध्ये गेले. या दोस्तांमुळे परत घेतलं तर त्रास झाला नाही. मग वाढतच गेलं. '

अरुण कोर्टात क्लार्क आहे. इतर ही मुलं बेकार आहेत. मी विचारलं, ' पैसे कसे जमवायचा ? '

' त्या वेळी स्वस्त होती. पूर्वी तीन रुपयाला पुडी मिळायची. मग पाचला मिळू लागली. पाचाचे आठ झाले. आठाचे दहा. आता तीच पुडी पंचवीस रुपयाला झालीय. सुरुवाती–सुरुवातीला आम्ही खूप ओढली. मग परवडेना. तेव्हा चारपाचजण मिळून एक पुडी आणायचो. आणि बाय राऊंड ओढायचो. पण मी सुरुवातीला असेल तर शेवटच्याला माझ्या निम्माच दम मिळायचा. '

' कुठून माल आणायचा ? भवानी पेठेतनं का ? '

शिऱ्या म्हणाला, ' तिथला अड्डा नंतर बंद झाला. पोलिसांचे छापे बसले. त्यामुळे सुरुवातीला जे मोठे धंदेवाले हा धंदा करायचे त्यांनी तो आता सोडून दिलाय. आता गर्द घेणाऱ्यांपैकीच काहीजण हा धंदा करतात. '

' सध्या हे व्यसन कमी होतंय का वाढतंय ? '

' विद्यार्थ्यांमध्ये पूर्वी लय होतं. आता ते कमी होतंय. म्हंजे जी घेत होती तेवढीच घेतात. नवी मुलं त्यात येवढी पडत नाहीत. पहिल्यांदा म्हणजे पानाच्या दुकानातनं चांदी घ्यायची की चालले आणायला. एक निग्रो मुलगा होता. धंदेवाला मला पाच रुपयाला पुडी द्यायचा, तोच त्या निग्रोला माझ्यादेखत दहा रुपयाला द्यायचा. मग पुढं पुढं मला दया यायची म्हणून मी पाच रुपयात पुडी घेऊन त्याला द्यायचो. त्याला महिन्याला तिकडनं चारपाच हजार रुपये यायचे. पण खायला पैसे नसायचे. शेवटी शेवटी तर तब्बेतीनं खंगून गेला होता. आता तो दिसतच नाही. एक तर त्याच्या देशात तो गेला असंल किंवा मेला तरी असंल. '

आईने स्टोव्हवर आमच्यासाठी चहाचं भांडं चढवलेलं दिसत होतं. ती म्हणाली, ' येवढं सगळं दिसत असून तुम्हाला काही शाणपण आलं नाही. पोलिस रोज समोर चकरा मारतायत. ते म्हणत होते, ही पोरं पिताना घावली तर पकडून नेनार. म्हणून तोंडं लपवून घरात बसता. अवो डाक्टर, याचा बाप गांजा प्यायचा. इतकं शरीर नासवून घेतलं आणि बेचाळिसाव्या वर्षी गेला. त्यानंतर हा गाडा मी ओढला लोकांच्या घरची कामं करून. आता हा पोरगा नोकरीला लागल्यावर मी कामं सोडून दिली तर याचं हे झालं. काय करायचं सांगा तुम्ही. '

अरुणला विचारलं, ' वाटव्यांची ट्रीटमेंट कधी घेतली तुम्ही ? '

' पंधरावीस दिवस झाले असतील. '

आई म्हणाली, ' मुंबईचे नाडकर्णी डाक्टर इथं आल्याचं कळालं. तवा त्यांच्या घरी जाऊन भेटले. त्यांनी वाटव्यांना चिठ्ठी दिली. मग याला त्यांनी ॲडमिट केलं. घरी आणलं. आन संध्याकाळी हे त्याचे दोस्त आले. याला बाहेर नेलं तवाच मी वळखलं का माझा साडेचारशे रुपायचा खर्च पाण्यात गेला. राती ओढूनच घरी आला. '

अरुण म्हणाला, ' पण नंतर आता सोडली. आजचा सहावा दिवस आहे, घेतली नाही. '

शिऱ्या म्हणाला, ' सहा दिवस आम्ही कोणीच घेतली नाही. '

' आणि तो ट्रकवाला ? '

शिऱ्या म्हणाला, ' त्याची एकदम बेकार कंडिशन आहे. ट्रकवर तर जात नाहीच. त्याची एक रिक्षा आहे. तो ती चालवायला द्यायचा. त्याचे वीसपंचवीस रुपये मिळायचे. आता तो रिक्षावाला पैसेबिसे देत नाही. फक्त एक पुडी आणून देतो. त्या कुटुंबाची अगदी खायची मारामार झालीय. तो बी खंगून गेलाय. कायम झोपूनच असतो. '



शेवटी त्या भागातल्या गर्दवाल्या मुलांची कधीतरी एक मीटिंग घ्यायची असं आम्ही ठरवलं आणि मी त्यांचा निरोप घेऊन निघालो.

० ० ०

वाटवे एका हॉस्पिटलला ॲटॅच्ड आहे. तिथं त्याने वडूजकर नावाच्या मुलाला ॲडमिट केलं होतं. त्यांना भेटायला संध्याकाळी ७॥–८ च्या सुमाराला गेलो. वडूजकरचे वडील कॉटवर बसलेले. वडूजकर दुसऱ्या कॉटवर अर्धवट झोपेत. बहुधा औषधांची ग्लानी असणार.

वडलांशीच बोलणं सुरू केलं.

ते म्हणाले,' हा बँकेत क्लार्क आहे. दोन वर्षांपासून हे व्यसन लागलं. आम्हाला त्याचा पत्ताच नाही. तीनदा ॲडमिट केलंय, पण उपयोग झाला नाही. परवा बँकेतल्या हिशोबात त्यानं येवढ्या चुका केल्यात की मॅनेजरने मला बोलावून घेतलं. मी त्यांच्या ऑफिसात त्यांचे पाय धरले. तेव्हा ते म्हणाले, ' मी आता एकच वाक्य सांगतो आणि आता बोलणं बंद. ही शेवटची संधी. ' तेव्हा हा परत ॲडमिट झालाय. '

' घरात चोऱ्याबिऱ्या केल्या का यानं व्यसनासाठी ? '

' त्याचा पगार त्यात तो घालवायचा. याला दीड हजार पगार आहे. तो पगार आम्ही कधी पाह्यलाच नाही. आईला शंभर एक रुपये द्यायचा तेवढे. परवा विचारलं, ' पगार झाला का ? ' तर म्हणाला, ' संडासात पडून गेला. ' याच्यावर मी काय समजायचं ते समजलो. आता मी इथल्या सगळ्यात बड्या सरकारी इंजिनियरचा हवालदार आहे. सचोटीने जन्म काढला. पैसे मिळवायची, व्यसनं लागायची संधी होती. पण ते केलं नाही. आता मी रिटायर होणार. हा मुलगा एकुलता एक. ह्याची नोकरी सुटली तर खायचं काय ? आम्ही नवराबायको रोज रात्री हा घरी यायची वाट पाहात बसतो. अकरा वाजतात, बारा वाजतात. परवा आम्ही असेच बसलो होतो. रात्री बारानंतर रस्त्यावर काही दारुडे घरी परत येताना दिसले. मी बायकोला म्हणालो, ' आता आपला पोरगा परत येईल बघ. कारण या लोकांची शाळा सुटलीय आत्ता. आणि खरं तो आलाच लगेच. '

मी हसू लागलो. त्यावर ते म्हणाले, ' अहो खरंच ह्यांची बी ही एक शाळाच आहे. एका ठरावीक वेळेला ते शाळा सुटल्यासारखे घरी परत येतात. तुम्ही जागून बघा एखाद्या दिवशी. '

' याचं लग्न झालंय का नाही ? '

वडलांनी चेहरा पाडला. ते म्हणाले, ' दोन महिन्यांपूर्वीच झालंय. '

मला जरा धक्काच बसला. विचारलं, ' तिला आधी याच्या व्यसनाची कल्पना दिली होती ? '

' नाही दिली. पण कुणकुण लागली असणार. आतासुद्धा आम्ही सांगितलंय की पडल्यामुळे छातीला काहीतरी झालंय म्हणून ॲडमिट केलाय. मुंबईची आहे. शिकलेली आहे. चांगली हसरी मुलगी आहे. इतका वेळ होती, आता डबा आणायला घरी गेलीय. '

काही वेळाने ती आलीच. विशीची, आणि खरोखरच अतिशय हसरी मुलगी होती. पण नजरेत शंका भरलेली. हिच्यादेखत आता याच्या व्यसनासंबंधी बोलून चालणार नव्हते. म्हणून त्यांचा निरोप घेतला.

वडूजकरांचे फॅमिली डॉक्टर हे माझे मित्रच निघाले. त्यांच्याकडे गेलो. ते म्हणाले, ' या मुलाची आई माझी मानलेली बहीण. त्याला मी खूप समजावलं. परवा तर त्याला मी मारायचंच बाकी ठेवलं होतं. हा लग्नानंतर पहिल्यांदाच त्याच्या सासुरवाडीला गेला. रात्री पूजा होती. पूजेनंतर दहा साडेदहाला जेवण होतं. हा मुलगा जेवायच्या जस्ट आधी म्हणाला, मी पंधरा मिनिटांत जाऊन येतो. आणि गेला तो रात्री एकला उगवला. सगळेजण काळजी करत थांबलेले. हा त्या काळात कुठे पावडर मिळतेय म्हणून भटकत होता. आला तोही धुंदीत असल्यासारखा. त्या मुलीचे वडील मुलाच्या वडलांना म्हणालेसुद्धा, की हे वागणं बरोबर नाही. या पोरानं सगळा पगार तर उडवलाच. बायकोच्या कानातलं उडवलं. म्हणाला, पडलं कुठंतरी. तुम्ही आत्ता आला ना, तेव्हा मी यांच्या घरी माझ्या कंपाउंडरला पाठवलं होतं, कुणी आहे का बघायला. ती मुलगी एकटीच होती. तिनं मला तर मागे विचारलंच होतं, पण आज या कंपाउंडरलाही विचारलं, की माझ्या नवऱ्याला नेमकं काय झालंय ते सांगा. '

मी म्हटलं, ' ते तिला सांगत का नाहीत ? '

' सांगावं का तिला ते ? '

' मला वाटतं, अंधारात ठेवू नये. कारण याचं व्यसन सुटायचं असेल तर त्याच्या बायकोचं त्यात मोठंच सहकार्य लागेल. सगळ्यांपेक्षा जास्त. या लपवाछपवीने या गोष्टी आणखीनच गुंतागुंतीच्या होतील. ते कुणी सांगायचं ते तुम्ही वाटल्यांना विचारा. मला वाटतं, त्याच्या वडलांनी तिला हे समजावून सांगावं. '

निघतांना ती मुलगी डोळ्यासमोर आली. वाटलं, हे कळल्यावर तिचा हसरेपणा टिकून राह्यला तर बरं.

० ० ०



माझा एक चौधरी नावाचा सायकियास्ट्रिस्ट मित्र आहे. तो पुण्याजवळच्या एका छोट्या शहरात प्रॅक्टिस करतो. तो मध्ये भेटला. मी ब्राऊन शुगरची माहिती घेतो कळल्यावर म्हणाला, ' आमच्या गावचं प्रकरण तुला कळलं की नाही ? '

' नाही बुवा. '

'अरे, माझे सायकियाट्रीचे पेशंट प्रिस्क्रिप्शन घेऊन एका केमिस्टच्या दुकानात जातात. इथलं ते मोठं प्रसिद्ध दुकान आहे. ते पेशंट परत फॉलोअपला आल्यावर सांगू लागले की, ' आम्ही त्या केमिस्टकडे औषधं मागितली तर तो म्हणाला, तुम्ही ही औषधं कशाला घेताय, त्यापेक्षा मी एक वेगळी पावडर देतो. ती सिगरेटमधनं ओढा. काळज्याबिळज्या, वेडबिड नाहीसं होईल सगळं. म्हणून आम्ही ती पावडर नेली बघा.' दोन-तीन वेळा ही तक्रार आल्यावर आम्ही ती पावडर मिळवली. तर ती ब्राऊन शुगर निघाली. मग पोलिसांवर आम्ही काही डॉक्टरांनी दबाव आणला. त्या केमिस्टला पोलिसांनी पकडलं. त्याच्याकडे ही पावडर सापडलीसुद्धा. त्याच्यावर पोलिसांनी खटला भरला. '

' मग काय झालं त्याचं पुढं ? '

' तो खटला आठ दिवस रोज पुकारला गेला. त्या केमिस्टनं कसं पोलिसांना मॅनेज केलं, माहीत नाही. पण पोलिस एकही दिवस कोर्टात हजरच राहिले नाहीत. सहाव्या का सातव्या दिवशी कोर्टानं जाहीर केलं की उद्या जर पोलिस हजर राहिले नाहीत तर निकाल एक्सपार्टी होईल. तरीही पोलिस हजर राहिले नाहीत, आणि तो माणूस सहीसलामत सुटला. '

० ० ०

याच शहरात सिव्हिल हॉस्पिटल आहे. पुण्यातल्या मेंटल हॉस्पिटलमधल्या एक सायकियाट्रिस्ट बाई आठवड्यातून एकदा तिथे ओ.पी.डी. चालवायला जातात. त्या म्हणाल्या, त्या हॉस्पिटलमधल्या मेडिकल स्टोअरमधला, केसपेपरवरनं औषधं देणारा अटेंडंट वीसवीस रुपये घेऊन या पुड्या पुरवायचा. ते सगळ्यांना माहीत असून त्याच्या भीतीमुळे गप्प बसायचे. मी बाहेरची असल्याने मला काहीच घाबरायचं कारण नव्हतं. मी सरळ तक्रार केली. खूप मोठं प्रकरण झालं. शेवटी ते दाबलं गेलं. त्या माणसाला काही झालं नाही. पण त्यानंतर त्यानं तो धंदा बंद केला.

मुंबईमध्ये जे. जे. हॉस्पिटलमध्ये ॲडिक्टसूना ॲडमिट करायची सोय सुरू केली. त्याचा फायदाही लोकांना मिळू लागला. त्याबरोबर ड्रगच्या धंद्यातल्या

लोकांनी बोगस माणसं ॲडमिट करून घेतली. त्यांच्यामार्फत गर्दच्या पुड्या ॲडमिट पेशंट्सना सर्रास पुरवायला सुरुवात केली. त्यावरनं मारामारीपर्यंत प्रसंग उद्‌भवले. या सगळ्यातून तिथली ती ॲक्टिविटीच बंद पडली आहे.

० ० ०

मध्ये नगर येथे प्रॅक्टिस करणारा डॉक्टर मित्र भेटला. तो म्हणाला, 'आमच्या नगरलाही हे व्यसन वाढतंय. विशेषतः ख्रिश्चन कॉलेजेसमधल्या मुलांपासून सुरुवात झाली, आता इतरही ते घेऊ लागलेत. मी ॲडमिट करतो म्हटल्यावर माझ्याकडे रीघच लागलीय. आम्ही काहीजणांनी पुढाकार घेऊन मीटिंग बोलावली. त्याला इथले पोलिस अधिकारी आले. त्यांनी आम्हाला सांगितलं की गर्द विकणाऱ्यांचे पत्ते द्या, आम्ही त्यांना पकडतो. मी म्हटलं की आम्ही कुणीही इथून म्हणाल तेव्हा गर्द आणून दाखवू शकतो, ते पत्ते, ती माणसं तुम्हाला माहीत नाहीत, असं थोडंच आहे? पण त्याबाबतीत पुढं काहीच झालं नाही.'

मी विचारलं, 'तुला खरोखरीच ही विकणारी माणसं माहीत होती?'

'मी पेशंटना विचारायचो. ते एका माणसाचं नाव सांगायचे. तोही कधीतरी माझ्याकडे औषधासाठी येऊन गेलेला होता. मी एक दिवस त्याच्या घरी गेलो आणि म्हणालो, 'मला गर्द पाहिजे.' तो सटपटलाच. म्हणाला, 'माझ्याकडं नाही. माझा काय संबंध?' मी म्हणालो, 'अरे, माझ्या एका पेशंटसाठी पाहिजे आहे. इमर्जन्सी आहे.' तेव्हा मग त्यानं काढून दिली. ओशाळून सांगत होता, 'डॉक्टरसाहेब, ही पुडी पुण्याला दहा रुपयाला मिळते, इथं वीस रुपयाला सगळे विकतात. मी मात्र बारा रुपयाला विकतो. यात मी काही कमवत नाही. माझं हे सोशल वर्कच चाललं आहे.'

आम्ही दोघंही हसलो.

तो म्हणाला, 'पोलिसांकडनं तरी कशा अपेक्षा करायच्या? अरे, तिघा पोलिसांनी गर्दसाठी माझ्याकडे ट्रीटमेंट घेतली आहे. आणि हे व्यसन आता कुठपर्यंत पसरलंय ते माहीत आहे का? परवा माझे पाथर्डीचे पेशंट आले होते. ते सांगत होते की ही पावडर आता पाथर्डीला पोचलीय. अगदी पाथर्डीसारख्या दुष्काळी गावात. तिथं रेशनची ज्वारीही धड मिळत नाही!'

० ० ०

मुंबईचा एक ॲडिक्ट सांगत होता, 'आम्ही शिर्डीला गेलो, जवळची पावडर संपली. आम्ही शोधाशोध करायला लागलो. कुठं मिळेना. तिथला एकजण म्हणाला, 'तुम्ही कोपरगावला जा, तिथं मिळेल.' मग आम्ही टॅक्सी करून रात्री



कोपरगावला आलो. तिथं मात्र मिळाली.'

मी म्हटलं, 'अगदी साईबाबाची कृपा.'

० ० ०

पुण्यातला एक पोलिस भेटला. म्हणाला, की आम्ही पिकपॉकेटसाठी किंवा कुठल्याही कारणासाठी पोरं पकडून लॉकअपमध्ये टाकतो ना, त्यात कळलं की एखादा पोरगा गर्दुल्लाआहे, तर आम्ही त्याला चार लाथा घालून हाकलून देतो. कारण ठेवलं त्याला, आणि रात्री त्याला त्रास व्हायला लागला, आणि काही होऊन बसलं तर जबाबदार कोण? तुमच्यासारखे लोक म्हणणार, पोलिस कस्टडीत मारहाणीनं मृत्यू!'

'पण समजा आधी हे कळलं नाही, आणि अपरात्री काही व्हायला लागलं तर.'

'आमच्यातला हेड कॉन्स्टेबल असतो ना, तो फार अनुभवी असतो. तो असल्या पाचसात पुड्या जवळ ठेवून असतो. अशी वेळच आली तर एखादी काढून देतो, आणि सकाळी त्याला हाकलून देतो. आम्हीच काय, पावडर पिणारा म्हणून कोर्टानंसुद्धा हाकलून दिलंय काहींना. नंतर मॅजिस्ट्रेट कस्टडीत काही भानगड नको म्हणून.'

मुंबई पोलिस खात्यात माझा एक लहानपणाचा मित्र आहे. तो आता एका पोलिस स्टेशनचा मुख्य इन्स्पेक्टर झालाय. तगडा, उंच, स्वभावानं उमदा. पोलिसी कामगिरीबद्दल अनेक पदकं मिळवलेला. त्यानं नुकताच गर्दचा एक साठा पकडल्याचं पेपरमध्ये आलं होतं.

त्याला विचारलं, 'कशी काय तुला बातमी लागली?'

'याच धंद्यातल्या एका छोट्या माणसानं टिप दिली, तसा त्या पत्त्यावर आम्ही छापा घातला. तिथं बरोबर माल मिळाला.'

'मला बघायला मिळेल का तो साठा?'

'हो. त्यात काय? चल ना.'

ऑफिसच्या मागे दुसऱ्या चाळीसारख्या बैठ्या इमारतीत आलो. स्टोअरच्या दाराचं कुलूप उघडून आत गेलो. सगळीकडे प्रचंड अडगळ पडलेली. समोर जमिनीवर दोन मोडक्या, गंजलेल्या ट्रंका एकावर एक ठेवलेल्या. वरची निळ्या रंगाची ट्रंक त्यानं उघडली. आत भाजणीच्या पिठासारख्या दिसणाऱ्या काळपट रंगाच्या पावडरनं भरलेल्या, तोंड दोऱ्यानं बांधलेल्या छोट्या सातआठ प्लॅस्टिकच्या पिशव्या होत्या.

ब्राऊन शुगर मी एवढी पहिल्यांदाच पाहात होतो, पण मला वेगळं काहीच वाटलं नाही.

मी विचारलं, ' याची किंमत काय असेल ? '

' सत्तर लाख. '

मग मात्र मी धसकलो. खालची ट्रंक उघडली. गोणपाटाच्या कव्हरखाली पांढऱ्या रंगाची पावडर भरलेल्या पिशवीचा थोडा भाग दिसत होता.

तो म्हणाला, ' हा प्युअर माल. हिरॉइन. याची किंमत वरच्याच्या कितीतरी पट आहे. '

मनात आलं, इतक्या कमी जागेत एवढी संपत्ती मावू शकते ? याबाबतीत हिऱ्यानंतर, सोन्यानंतर ब्राऊन शुगरचाच नंबर लागत असेल.

गर्दचे साठे पकडल्याच्या बातम्या पेपरातनं आल्या तेव्हा अनेकजण म्हणत होते की, या पकडलेल्या मालाचं पुढं काय होतं ? का तो परत बाजारात येतो, याबद्दल माझ्याही मनात शंका होती. मी विचारली.

तो म्हणाला, ' नुसती पडून राहण्यानं हिच्यातली पॉवर खूप कमी होते. आणि काम झाल्यावर आम्ही ती डिस्ट्रॉय करतो. '

' पण कशी डिस्ट्रॉय करता ? '

' साधं पाणी याच्यावर ओतलं तरी ती डिस्ट्रॉय होते. '

० ० ०

पुण्यात एक माझा मित्र आहे. त्याचे पोलिसांशी, आमदारांशी, मंत्र्यांशी, गुन्हेगारी जगाशी जवळून संबंध आहेत. एकमेकांची तो कामं करून देतो. त्याच्याकडे बसलो असताना लांबून एक पंचविशीचा बुटका, सावळा, शिडशिडीत तरुण येताना दिसला. मित्र म्हणाला, ' हा येतोय ना, हा फाळके. याला तुम्ही गर्दच्या धंद्याबद्दल विचारा. हा पोरगा दिसतोय असा, पण डायनामाईट आहे. सुपाऱ्या घेऊन खून पाडतो. कितीही कडेकोट बंदोबस्तात कोणी दादा राहात असला तरी समोर जाऊन घाव घेऊन टपकणार आणि वार करणार, असा आहे. मुंबई, पुणं दोन्हीकडं हा काम करतो. '

फाळके आला. मित्रानं माझी ओळख करून दिली. काम सांगितलं.

तो म्हणाला, ' आजकाल हा गर्दचा धंदा फार वाढलाय. जो उठतो तो या धंद्याकडे वळतोय. पूर्वी या धंद्यात गुन्हेगार लोकच होते. आता सगळे चाललेत. मोठमोठे मारवाडी व्यापारी लोक या मॉमेडियन धंदेवाल्यांना भांडवल पुरवतात.



म्हणतात, 'आमच्यापर्यंत काही भानगड आणू नका. पैसा हवा तेवढा घ्या. दुप्पट करून आणून द्या.' अहो या धंद्यावर एका वर्षात टोयोटो गाडी, तीन-तीन, चार-चार फ्लॅट मुंबईत घेतलेत एकेकानं. पैसा खूप आणि सोपा धंदा. '

' सोपा कसा ? '

' इतर धंद्यांच्या मानानं सोपा. स्मगलिंगमध्ये किती कटकट असते. केवढी यंत्रणा, पडाव, कस्टम, विक्री. . . दारूच्या धंद्यातही दारू गाळायची कुठं, ती पिंपं ठेवायची कुठं, अशा कटकटी असतात. या धंद्याचं तसं नाही. आला माल आणि गेला माल. आपण काहीच करायचं नाही. बरं आकारानं थोडा. छपराखाली लपवता येतो, जमिनीत पुरून लपवता येतो. पण साहेब, फार खराब व्यसन हे. माणसाची पुरती बरबादी करतं. मी या धंदेवाल्यांना म्हणतो, ' साल्यांनो, दरोडे टाका, बँका लुटा, मजेत पैसे उडवा. पण असले कसले धंदे करता ? लोकांचे शिव्याशाप कशाला खाता ? '

गंमत वाटून मी म्हटलं, ' मग त्याच्यावर काय म्हणतात हे लोक ? '

' ते म्हणतात की, ' हम दुनिया का खयाल क्यूं रखे ? जब हम मरते थे, तब हमारा खयाल रखती थी क्या ? अब हम दुनिया को क्यूं पुछे ? ' साहेब, या धंद्यामुळे माझं डोकं आऊट होतं. बोला, मी एकटा जाऊन हे अड्डे उध्वस्त करायला तयार आहे. तुम्ही मागची पोलिसांची, कोर्टाची भानगड सांभाळता का ? '

मी गडबडलोच. ते नंतर पाहू असं म्हणून वेळ मारून नेली.

विचारलं, ' हा माल कुठून येतो, याची कल्पना आहे का ? '

' साहेब, पूर्वी हा माल बाहेरनं यायचा. आता मुंबईच्या धंदेवाल्यांनी सातपुड्यातल्या जंगलात राहणाऱ्या लोकांना पैसे देऊन अफूची झाडं लावलीत. मुंबईत पोटमाळ्यावर अफूची ब्राऊन शुगर करायच्या छोट्या-छोट्या भट्ट्या लावल्यात लोकांनी. तुम्ही चला माझ्याबरोबर. दाखवतो एकेक ठिकाण. आता माल बाहेरनं कमी प्रमाणात येतो. थोड्याच दिवसांत आपण याबाबतीत. . . . काय तुम्ही पेपरवाले शब्द वापरता. . . तो. . . '

' कुठला ? '

' तोच हो. . . हां हां. . . स्वयंपूर्ण होणार आपण. '

आम्ही तिघंही हसलो. मित्रानं त्याच्या पाठीवर थाप मारली व म्हणाला, ' भलताच ज्ञानी, पंडित झाला आहेस तू. '

० ० ०

पुण्याच्या पोलीस कमिशनरांनी गर्दला आळा घालण्यासाठी खास 'नारकॉटिक सेल' उघडल्याचे पेपरमध्ये वाचलं होतं. बरेच दिवस हा सेल पहावा असं मनात चाललं होतं. कोण इन्स्पेक्टर तिथं असतात याची चौकशीही करीत होतो. पण परवाच समजलं की दिलीप शिंदे हे सबइन्स्पेक्टर तिथं आहेत. आधी एका छोट्या प्रकरणात त्यांनी मला अदत केल्याने ते माहीत होते. त्यांना फोन करून भेटायला गेलो.

कमिशनर ऑफिसच्या नवीन तीन मजली बिल्डिंगला वळसा घालून मागच्या बाजूच्या 'व्हिजिलन्स ब्रँच'कडे गेलो. दिलीप शिंदे जिथं बसतात ते टेबल एकानं दाखवलं. शिंदे यायला उशीर होणार होता, त्यांची वाट पहात बसलो. ते ऑफिस म्हणजे जुना छोटा बंगला होता, त्यात अनेक पार्टिशन्स घालून टेबलं, खुर्च्या टाकलेली. भिंतीना रंग खास सरकारी. ऑईलपेंट पण रंगसंगतीचा पत्ता नसलेला. खोलीत एका बाजूला जुनी स्कूटर उभी केलेली. तिच्या पुढे, मागे, वर जुन्या सायकलींचा खच पडला होता. सायकलची काही सुटी चाकेही डोकी वर काढत होती. या सगळ्यावर प्रचंड धूळ साठलेली होती. हा सगळा जप्तीचा माल असणार. भिंतीवर साईबाबांचा फोटो लटकत होता, त्यावर लिहिलं होतं, 'सबका मालिक एक.'

संध्याकाळी साडेसात–आठची वेळ होती. ऑफिसात दुसरं कोणीच नव्हतं. तीनचार टेबलं होती. रुंद फळ्यांचे बेढब, लाकडी बाकं होती. कोपऱ्यातली डुगडुगणारी खुर्ची आणि समोरचं छोटं टेबल, येवढाच कोपरा म्हणजे 'नारकॉटिक सेल' होता.

दिलीप शिंदे आले. पस्तिशीचे असावेत. जाडजूड, स्मार्ट चेहेऱ्याचे आणि केस साईडने किंचित पांढरे व्हायला लागलेले. मला एक खुर्ची ओढून माझी बाकड्यावरून खुर्चीवर अशी पदोन्नती केली. म्हणाले, 'बोला, माझ्याकडून काय हवंय?'

मी माझं काम सांगितलं. विचारलं, 'मला गर्दच्या पुण्यातल्या धंद्याचं स्वरुप सांगा.'

'मुंबईच्या आणि पुण्याच्या धंद्यात फार फरक आहे. पुण्यात जास्त कोणी स्टॉक करत नाही. मुंबई जवळ आहे, जायला यायला साधनं खूप आहेत. अनेक रेल्वेगाड्या आहेत, टॅक्स्या आहेत, एशियाड आहेत. त्यामुळे माणूस सहजपणे कुठल्याही वेळेला मुंबईला जाऊन माल घेऊन येऊ शकतो. त्यामुळं पाच ग्रॅम, दहा ग्रॅम अशी क्वांटिटी आणतात. किलो बिलो आणायच्या भानगडीत पडत नाही.



माल आणायचा, पुड्या करायच्या, विकून मोकळं व्हायचं.'

असं म्हणून ड्रॉवर उघडून त्यांनी एक सपाट पुडी काढून पुढे टाकली. डॉक्टर पूर्वी पावडरच्या पुड्या करायचे तशी ती होती. मध्ये पावडर ठेवून दोन आडवे फोल्ड मारायचे आणि त्याची दोन टोकं परत एकमेकांवर दडपून टाकायची. या पुडीचा कागद अर्धपारदर्शक असला तरी तो टिश्यू पेपर नव्हता. त्यापेक्षा कडक होता आणि ते प्लॅस्टिकही नव्हतं.

शिंदे म्हणाले, 'हाच कागद सगळे वापरतात.'

'का?'

'त्याला पावडर अजिबात चिकटत नाही.'

शिंद्यांच्या समोर पांढरा पायजमा, शर्ट आणि पांढरी टोपी घातलेले शिवथरे नावाचे 'रायटर' बसले होते. त्यांनी जाड कागदाची, सिगरेटच्या आकाराची नळकांडी समोर आणून ठेवली. त्या नळीच्या दोन्ही बाजूला जाड कागदाच्या रिंग्ज चिकटवून भक्कमपणा आणला होता.

शिंदे म्हणाले, 'चेस करण्यासाठी मुलं ही पन्नी वापरतात.'

शिवथऱ्यांनी खुडबुड करून कुठून तरी एक फाटका लाल रंगाचा रबरी चेंडू आणून ठेवला. तो हातात घेऊन शिंदे म्हणाले, 'यातून गर्दची वाहतूक चालते.' त्यांनी चेंडू उलगडून दाखवत म्हणाले, 'आता हा फाडलाय तो आम्ही. मुळात अखंड होता.' त्यांनी बोटाने ताणून एक बुजलेलं भोक दाखवलं. म्हणाले, 'या भोकातून ते माल आत पिचकारीने भरत असावेत. नंतर हे भोक पूर्वीसारखं होऊन बसतं. माल गळत नाही. परत हा चेंडू कुठंही लपवता येतो.' त्यांनी शर्टाच्या आत बॉल घालून काखेत घालून हात त्यावर दाबून नेहेमीसारखा केला. म्हणाले, 'संपलं, कुणाला ओळखू येणार आहे? एखाद्या बाईनं असा हा लपवला तर पत्ताही लागत नाही. आम्ही झडतीला गेलो तर हा बॉल सरळ छपरावर टाकून देतात, नाहीतर खाली फेकून देतात.'

'तुम्हाला कसा याचा पत्ता लागला?'

'आम्ही जेव्हा झडतीला जातो तेव्हा काही सोडत नाही. तुम्ही माझ्याबरोबर झडतीला आला तर तासा दीड तासात कंटाळून जाल.'

'आतापर्यंत किती अशा लोकांना पकडलं आहे?'

'बऱ्याच जणांना. वीसपंचवीस तरी केसेस केल्या असतील.'

शिवथऱ्यांनी रजिस्टर काढून एका ओळीवर बोट ठेवून सांगितलं, 'एकतीस केसेस केल्यात आतापर्यंत.'

शिंदे म्हणाले, ' यांना पकडणं तसं फार अवघड असतं. समजा ' एक्स ' या माणसाला गर्द पाहिजे असेल तर तो त्या एरियात फिरायला लागला की ' ए ' नावाचा माणूस त्याला विचारतो, ' साब, गर्द चाहिये क्या ? ' त्याच्याकडून पैसे घेतो आणि तो ' बी ' माणसाकडे जातो. ' बी ' पैसे घेतो पण पुडी ' सी ' माणसाकडे देतो. ' सी ' जाऊन ' एक्स 'ला पुडी देऊन सटकतो. असा जनरली त्यांचा मोड्स ऑपरेंडी असतो. एकदा तर आम्ही शंभराच्या दोन नोटांवर खुणा करून आम्ही गिऱ्हाइक पाठवलं होतं. ती नोट गणेश पेठेतनं, चुडामण तालमीजवळ गेली. तिथून एडी कॅंप चौकात आणि शेवटी काशीवाडी झोपडपट्टीत गेली. तासाभरात ती नोट चार हातातून गेली. '

' पण मग तुम्हाला हे कसं कळलं ? '

' आम्ही बरोबर मागावर राहून ती छापा घालून पकडली. '

' भलतंच अवघड काम असणार ते. '

' आम्हाला अवघड कामाचं वाटत नाही हो काही. पण नंतर फार फ्रस्टेशन येतं. आम्ही धंदेवाले शोधून काढायला, त्यांना मालासकट पकडायला काय काय केलंय. रात्रीच्या वेळी पायपावर चढून बिल्डींगच्या गच्चीवर चढलोय. गच्चीवरून बायनॉक्यूलरने विशिष्ट घरांवर वॉच ठेवलाय. आमचे हे हावलदार दूधवाल्याचा ड्रेस करून, सायकलवर दुधाच्या बरण्या लावून त्या एरियात दूध घालत कितीतरी दिवस फिरलेत. मेकॅनिकचा ड्रेस देऊन तिकडं वावरलेत. एकेका केससाठी आठआठ दिवस, रात्रंदिवस जाग्रणं करून त्या केसेस मुद्देमालासकट दाखल केल्या आणि पुढं काय झालं त्याचं ? '

' काय झालं ? '

' दहा मिनिटात जज्जने त्यांना जामिनावर सोडलं. ते सुद्धा तीन आरोपींना मिळून हजार रुपये जामीन. मी जज्जना जीव तोडून सांगत होतो, तुम्ही यांना सोडू नका. हे बाहेर पडून हाच धंदा करतील. पण जज्जनी जामीन द्यायचा ठरवलं. मी त्यांना म्हणालो, निदान तुम्ही मोठा जामीन तरी द्या. ही माणसं तासाभरात पन्नास हजार रुपयेसुद्धा आणून देतील, इतकी ही श्रीमंत आहेत. पण त्या आरोपीची आई छाती बडवून सांगत होती, साब हम बहुत गरीब लोग है। त्याच्यावर जज्जनी विश्वास ठेवला. मला इतका संताप आला की विचारू नका. पण मी काय करणार होतो ? आम्ही त्याला आधी दम देऊन सांगत होतो, ' तुला असा यंव करतो, त्यंव करतो, हा धंदा करतोस म्हणजे मजा नाही, आता भोगशील फळ. . . ' आणि हा माणूस दहा मिनिटात जामीन मिळवून



आमच्यासमोरनं ऐटीत निघून जातो. '

' परत ते लगेच तो धंदा सुरू करतात की काही काळ तरी थांबतात ? '

' लगेच. पण यावेळी ते अधिक चातुर्याने करू लागतात. त्याला या प्रकरणातनं समजतं की ' पुलिस हमारे पीछे है ' म्हणून तो हुशारीने वागायला लागतो. हा आमच्यादृष्टीने फार तोटा आहे. पहिल्यावेळी त्याला कल्पना नसताना मुद्देमालासकट पकडणं सोपं असतं. आता एक मोठा धंदेवाला हॉस्पिटलमध्ये ॲडमिट झालाय. तिथं राहून तो धंदा चालवतो. त्याला त्याची मुलं, माणसं भेटायला येत जात असतात. नुसत्या निरोपानिरोपीने धंदा करतो. आम्ही आता हॉस्पिटलमध्ये जाऊन पकडावं तर तुम्हीच म्हणाल, पोलिसांनी हॉस्पिटलमध्ये घुसून दांडगाई केली. तरी त्याला पकडून आम्ही इथं आणला तर आल्या आल्या छातीला हात लावून बसला. ही येवढी लांब कार्डिओग्रॅमची पट्टी आमच्यासमोर धरली. त्याच्या मुलाने औषधांच्या गोळ्यांचा येवढा पुडा बरोबर आणला होता. त्याची बायको म्हणाली, ' साब, ये आदमी बीमार है, उसे हाथ मत लगाना।' बोला काय करायचं आम्ही ? '

शिवथरे म्हणाले, ' याच माणसावर आमच्या सहा केसेस आहेत. '

' पुढं या केसेसचं काय होतं ? '

' बरंच असतं. केमिकल ॲनालायझरचा रिपोर्ट येतो. पण पुढं केस आमच्याकडे रहात नाही. हद्दीतल्या त्या त्या पोलीस ठाण्याच्याकडे ती सोपवली जाते. निदान यांना जामिनावर सोडलं नसतं ना, तरी आम्ही पुण्यातला धंदा बंद पाडू शकलो असतो. '

' मग हे तुम्ही गव्हर्मेंटला का कळवत नाही ? '

' आमच्या कमिशनर साहेबांनी डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट्सची मिटिंग बोलावलीय. बघू या काय होतंय त्यात. '

थोडं थांबून शिंद्यांनी मला विचारलं, ' का हो, तुम्ही डॉक्टर आहात म्हणून विचारतो, या व्यसनानं किती काळानंतर पुरुषत्व जातं हो ? '

' साधारण वर्षभरात. '

' मी आता या लोकांमध्ये वावरतो ना, या सेक्सचे भयानक परिणाम होताना दिसतात. गर्द घेतलं की सेक्सला मजा येते किंवा सेक्सचा दम बराच वेळ टिकतो असा या पोरांमध्ये फार मोठा गैरसमज आहे. मग काही दिवस घेतल्यावर त्याला सेक्स जमेनासा झाला की त्या पोरीच्या ते लक्षात येऊ नये म्हणून तिलाही तो हे व्यसन लावतो. दोघंही धुंदीत. सेक्स होतोय की नाही हे तिलाही कळत नाही. '

'मुलींमध्ये आहे व्यसन हे ?'

'हाय सोसायटीमधल्या मुलींमध्ये आहे. खालच्या थरातला एक तरुण पोरगा या व्यसनात सापडला आणि त्याला सेक्स जमेनासा झाला. त्यामुळे बायको व्यभिचार करू लागली. अशी उदाहरणं आहेत. त्या बाईला आपण दोष कसा देणार ? एका बाईनं तर यापायी जाळून घेतलं स्वतःला.'

'जाळून घेतलं ?'

'अहो, या व्यसनामुळं पैशाच्या दृष्टीनं डबघाईला आलेले आणि त्यात शरीरसुखही नाही. काय कारणार ती ?'

शिंद्यांनी ड्रॉवर उघडून पिन लावलेल्या पाचदहा इनलँडचा गड्डा दाखवला. म्हणाले, 'अशी निनावी पत्रं रोज येतात. काही पत्रं तर एकाच माणसाच्या अक्षरातली आहेत. बघा ना.'

मी एक दोन पत्रं वाचली. 'अमक्यानं आता परत धंदा सुरू केला आहे. त्याच्याबरोबर अमकी माणसं काम करतात...' अशा तऱ्हेचा मजकूर होता. मी विचारलं, 'किती टक्के पत्रातली माहिती खरी ठरते ?'

'पंचवीस टक्के. आता मी या सेलमध्ये काम करतोय, या ॲडिक्ट्समधल्या बऱ्याचजणांची ओळख आहे. ही पत्रं कोण पाठवतं याचा मला अंदाजही आहे.'

माझी निघायची वेळ झाली होती. उठताउठता म्हणालो, 'का हो, या बाबतीत पोलिसांमध्ये करप्शनचा प्रॉब्लेम कितपत येतो ?'

'मला तसं वाटत नाही. कारण हे व्यसनंच इतकं खराब आहे की ज्याची खोपडी जाग्यावर आहे असा कुणी यात पैसे खाणार नाही. माझ्या तरी पाहण्यात असं काही नाही.'

'तुम्हाला काही कुणी ऑफर केलं होतं का ?'

शिंदे हसले. म्हणाले, 'त्या लोकांच्या बुकात माझं नाव अगदी खराब आहे. ते असं ऑफर करायला धजणारच नाहीत.'

० ० ०





# १०

नेदरलँडचा एक मित्र सध्या एका संशोधनासाठी इथं आलाय. तो परवा घरी आला होता. हा विषय निघाल्यावर म्हणाला, ‘ आमच्याकडे हा जंकीजचा प्रॉब्लेम खूप आहे. विशेषतः आम्ही ज्या भागात राहतो ते म्हणजे जंकीजचं आगरच आहे. कुठल्याही खिडकीतनं बाहेर नजर टाकली तर फुटपाथ फुटपाथने ड्रग इंजेक्ट करून घेणारे, ॲडिक्ट्स् दिसतात. ’

‘ या प्रश्नासाठी तुमच्याकडे काय काय उपाय करतात ? ’

तो म्हणाला, ‘ याबाबतीत आमच्याकडे या प्रश्नाचा अगदी वेगळा विचार करणारा एक मोठा वर्गच आहे. आणि मीही त्याच मताचा आहे. आमचं म्हणणं, की बाहेरच्या देशांमधले जे जंकीज इथं आलेत, त्यांना त्यांच्या देशात परत पाठवा. आणि जे डच जंकीज आहेत त्यांना सरकारने फुकट हेरॉईन पुरवावं. ’

मी धक्का बसून म्हटलं, ‘ फुकट ? ’

‘ हो. कारण ड्रग ॲडिक्शनमधनं निर्माण झालेले बरेचसे प्रश्न हे हेरॉईन खूप महाग असल्याने झालेले आहेत. ज्या क्षणी तुम्ही हे कराल त्या क्षणी क्राइम रेट खाली येईल. हेरॉईन मिळवण्यासाठी जी सतत विवंचना ॲडिक्टना करावी लागते त्यातून त्यांचं ॲडिक्शन आणखी वाढतं, तेही कमी होईल आणि आमच्या देशात वेलफेअरवर येवढा खर्च नाहीतरी करतातच तर हा उपाय करून बघायला काय हरकत आहे ? आमच्या ॲमस्टरडॅम म्युनिसिपल कॉर्पोरेशनने तसा ठरावही केला. पण नेदरलँड गव्हर्मेंटने त्याला विरोध केला. त्यात त्यांनी ह्या दृष्टिकोणाला विरोध केलेलाच नाही. त्यांचे म्हणणे असे की आपल्या शेजारच्या देशांनी हा कार्यक्रम घेतला नाही, आणि फक्त आपणच घेतला तर सगळ्या जगातले जंकीज इथं हेरॉईन फुकट मिळतं म्हणून इतकी गर्दी करतील की आपल्याला चालायला जागा राहायची नाही. ’

मी हसलो व म्हणालो, ‘ खरंय ते. ’

तो म्हणाला, ‘हेरॉईन ॲडिक्शनला आपण जितकं बदनाम केलं तेही वाजवीपेक्षा जास्तच केलं आहे. दारू जितकी वाईट तितकंच हेरॉईन वाईट. पण दारूला सामाजिक मान्यता असल्याने त्याचे दुष्परिणाम आपल्याला दिसत नाहीत. आपण सहजपणे सांगतो की मी पबमध्ये जाऊन बियर पिऊन आलो. तसं मी

हेरॉईन इंजेक्शन घेऊन आलो असं का सांगू शकत नाही ? दारू हे तिशी–चाळिशीत वाढणारं व्यसन असल्याने त्या माणसाचं लग्न झालेलं असतं, मुलं झालेली असतात. त्यामुळे त्याच्याबरोबर त्याची फॅमिली डिस्ट्रॉय होते. परत अलीकडे झालेल्या पाहणीत असं आढळलंय की चाळीशीच्या पुढं गेलेले अनेक हेरॉईन ॲडिक्टस् कुणाचीही मदत न घेता अगदी आपण होऊन व्यसन सोडतात. नंतर त्यांना परत या जगात आल्यावर अनेक प्रॉब्लेम्स येतात. शिक्षणाचा काळ व्यसनात वाया घालवलेला असतो. त्यामुळे सेटल व्हायला अनेक अडचणी येतात, तरीही ते परत व्यसनाकडे वळत नाहीत. म्हणून या व्यसनाकडे दुर्लक्ष जसं करू नये तसा त्याचा बाऊही करू नये. '

° ° °

' कोलमन 'च्या ॲब्नॉर्मल सायकॉलॉजीच्या दणदणीत जाड्या पुस्तकात ड्रग ॲडिक्शन प्रकरणात वाचलं, अमेरिकेच्या व्हिएटनाममध्ये असलेल्या सैनिकांपैकी तीस ते चाळीस हजार सैनिक ड्रग ॲडिक्ट आहेत, असं एका अधिकृत कमिशनच्या रिपोर्टात आहे. नंतर काही वर्षांनी केलेल्या पाहणीत असं आढळलं की यातले बरेच सैनिक परत अमेरिकेत आल्यावर व्यसनातून सुटले. याचा अर्थ ॲडिक्शनला कारणीभूत असलेली परिस्थिती बदलली तर ॲडिक्शन सुटू शकते.

पुस्तकात एका नुकत्याच जन्मलेल्या आणि मेलेल्या मुलाचा फोटो आहे. खाली माहिती दिली आहे, हेरॉईन ॲडिक्ट बाई, ती गर्भारशी असताना जर हेरॉईन घेत असेल तर गर्भातले तिचे मूलही आपोआपच ॲडिक्ट होते. जन्मल्याजन्मल्या काही तासांनी ते मूल हेरॉईन न मिळाल्याने उलटया, जुलाब अशा विथड्रॉल सिम्प्टम् दाखवायला लागतं. आईचं ॲडिक्शन लक्षात न आल्यास ते मूल डिहायड्रेशन होऊन मरतं.

° ° °

अफू या पिकाबद्दल आणि जगभर चाललेल्या ड्रगच्या व्यापाराबद्दल ' नॅशनल जिऑग्राफिक 'च्या फेब्रु. ८५ च्या अंकात सविस्तर माहिती आली आहे. जगात अधिकृतरीत्या, औषधासाठी सर्वांत जास्त अफू पिकवणारा देश म्हणजे भारत. अमेरिकेची मॉर्फिन बनवण्यासाठी अफूची जी गरज आहे त्यातली दोन तृतीयांश गरज भारत भागवतो. भारतातली ३२,००० हेक्टर्स जमीन अफूच्या पिकाखाली आहे. राजस्थान व मध्यप्रदेशातल्या जवळपास ७,००० गावांतून हे पीक घेतलं जातं. राजस्थानमधल्या गाझीपूर येथे आणि मध्यप्रदेशातल्या निमच येथे अफू तयार होते. तिथे अफू गैरमार्गाने बाहेर जाऊ



नये म्हणून येवढी दक्षता घेण्यात येते की नॅशनल जिऑग्राफीच्या वार्ताहराचे आणि फोटोग्राफरचे परत जाताना बुटाचे तळही खरवडून, अफू चिकटलेली नाही याची खात्री करून घेण्यात आली.

अनधिकृतरीत्या अफूचं पीक काढणारे देश म्हणजे पाकिस्तान, अफगाणिस्तान, ब्रह्मदेश, थायलंड, लाओस, मलेशिया, मेक्सिको इ. पाकिस्तान–अफगाणिस्तानातल्या सीमेवरच्या डोंगराळ भागात हे उत्पादन होते. या भागात पठाण–बलुची टोळीवाल्यांचे राज्य आहे. त्या त्या सरकारांनासुद्धा टोळीप्रमुखां–मार्फतच राज्य करावे लागते. या देशांमध्ये तयार होणारं हेरॉईन अमेरिकेला प्रामुख्याने जातं. म्हणून अमेरिकन सरकारने पाकिस्तान सरकारवर ही अफूची शेती बंद पाडण्यासाठी खूप दडपण आणलं आहे. या भागातल्या शेतकऱ्यांनी अफूऐवजी ज्वारीचं पीक घेतलं तर त्यांना अमेरिकन सरकार भरपाई देतं. त्यासाठी त्या भागात अमेरिकन सरकारने कालवे बांधून विकासकार्येही केली आहेत. तिथलं अफूचं उत्पादन कमी झालं असलं, तरी थांबलेलं मात्र नाही.

मेक्सिकोतनं बरंचसं हेरॉईन अमेरिकेत येतं. म्हणून मेक्सिकन सरकारच्या परवानगीनं अमेरिकन सरकार हेलिकॉप्टरने अफूच्या शेतांवर खतांची फवारणी करतात. त्यामुळे अफूची झाडं भसाभस वाढून जळून जातात. आता मेक्सिकोतल्या अफूवाल्यांनी एकत्रित, प्लॉट्समध्ये न लावता देशात निरनिराळ्या ठिकाणी विखरून अफूची झाडं लावायला सुरुवात केली आहे.

° ° °

' विथड्रॉल सिम्प्टम् 'ला व्यसनी जगात ' टर्की ' म्हणतात. या टर्की शब्दाविषयी कुतूहल वाटायचं. इंग्लिश पुस्तकं वाचताना कळलं की हा शब्द इंटरनॅशनल आहे. तोपर्यंत मला वाटायचं की हा आपल्याकडचा ' गर्द 'सारखा इथलाच शब्द आहे. एका पुस्तकात ' टर्की ' का म्हणतात तेही दिलेलं होतं. ते असं : ' विथड्रॉलमध्ये असताना ॲडिक्टला घामही येतो आणि हुडहुडी भरून केसही ताठ उभे राहतात. त्यामुळे तो टर्की या कोंबडीसारख्या पक्ष्यासारखा दिसतो. त्यावरून हा शब्द आलाय. '

हे मी एका मित्राला सांगितलं तेव्हा तो म्हणाला, ' मग टर्की या देशात (तुर्कस्थानात) पेशंट टर्कीत गेला तर काय म्हणतात ? '

मी हसलो व म्हणालो, ' कदाचित, इंडियात गेला म्हणत असतील ! '

° ° °

मुंबईच्या के.ई.एम्. हॉस्पिटलच्या आवारातल्या मोठ्या सभागृहात या जानेवारीत एक दिवसाचे ड्रग ॲडिक्शनवर वर्कशॉप झाले. त्यात मुंबई महापालिकेचे उपआयुक्त पी. डी. करंदीकर हे तरुण सरकारी अधिकारी बोलले. ते म्हणाले, ' सरकार यासाठी आवश्यक ती पावलं उचलीत आहे. पंतप्रधान राजीव गांधींच्या अमेरिका भेटीत अमेरिकन सरकारने असा आग्रह धरला की मुंबई हे ड्रग ट्रॅफिकचे आंतरराष्ट्रीय केंद्र बनत आहे, त्याविरुद्ध सरकारने स्ट्राँग मेझर्स घ्यावीत. मुंबई पोलिसांती त्यासाठी वेगळा सेल काढला आहे. हा ट्रॅफिक बंद व्हावा यासाठी पंजाब आणि ब्रह्मदेश या आंतरराष्ट्रीय सीमा आपल्या देशाने सील केलेल्या आहेत. या सीमांवर इन्टेन्सिव्ह पेट्रोलिंग चालू आहे. या देशातच हेरॉईनचे उत्पादन होऊ नये म्हणून मॉर्फिनवर ॲसिटिक अन्हायड्राईडची प्रक्रिया करून हेरॉईन तयार करतात, त्या ॲसिटिक अन्हायड्राईड या केमिकलवरसुद्धा बंदी आणण्याचा सरकार विचार करीत आहे. '

जस्टिस जहागिरदार म्हणाले, ' सरकारने यासाठी पूर्वीचा कायदा बदलून अतिशय स्ट्राँग कायदा आणला आहे. कोणीही हे मादक द्रव्य घेताना, उत्पादन करताना, वाहतूक करताना. . .इ. मध्ये सापडल्यास त्याला दहा वर्षं शिक्षा आणि एक लाख रुपये दंड आहे. परत तोच गुन्हा करताना तो सापडल्यास तीस वर्षे शिक्षा आणि तीन लाख रुपये दंड अशी शिक्षा सांगितलेली आहे. या कायद्याचे वैशिष्ट्य म्हणजे एरवी न्यायाधीश इतकी शिक्षा करू शकतात, पण आरोपीचा विचार करून त्यापेक्षा कमी शिक्षाही करू शकतात. या कायद्याप्रमाणे कमीत कमी येवढी शिक्षा त्यांनी केलीच पाहिजे. दुसरं असं की आपण निरपराधी आहोत असं सिद्ध करायची जबाबदारी आरोपीवर टाकलेली आहे. '

त्यानंतर दिल्लीचे सायकियाट्रिस्ट डॉ. देवेंद्र मोहन बोलले. पी. डी. करंदीकरांच्या भाषणाचा उल्लेख करून म्हणाले, ' आपल्या समाजात येवढं करप्शन आहे की आंतरराष्ट्रीय सीमा कधीही ' कंप्लीटली सील ' करता येतील, यावर कुणाचाही विश्वास बसणार नाही. एका रिपोर्टप्रमाणे तर पंजाब पोलिसांमध्ये २५ टक्के पोलीस ड्रग ॲडिक्ट आहेत. दुसरं ॲसिटिक अन्हायड्राईड या केमिकलवर बंदी आणून हा प्रश्न सुटणार नाही. हेच केमिकल आपल्या टेक्स्टाईल इंडस्ट्रीला मोठ्या प्रमाणावर लागते. त्यावर बंदी आणल्याते ते महाग होणार आणि आधीच सिक् असलेली ही इंडस्ट्री आणखी सिक् होणार. '



जस्टिस जहागिरदारांनी वर्णन केलेल्या कायद्याचा उल्लेख करून ते म्हणाले, ' आज या कायद्याचे सर्वजण स्वागत करताहेत. पण नागरी स्वातंत्र्यवाद्यांनी याचा गंभीरपणे विचार करावा. समजा, मला पोलिसांनी बळेच पकडून चौकीवर नेले आणि माझ्या खिशात अशा ड्रगची पुडी टाकून दिली तर मला संरक्षण काय ? मी माझं निरपराधित्व कसं सिद्ध करणार ? मी दहा वर्षं तुरुंगात काढायची आणि लाख रुपये भरायचे ? पोलिस हे काहीही करायला केपेबल आहेत. तुमच्या महाराष्ट्रातल्या पोलिसांबद्दल मला माहिती नाही. पण यू. पी., बिहारमध्ये पोलिस हे काहीही धुमाकूळ घालू शकतात. एका ढोबळ अंदाजाप्रमाणे पस्तीस ते पंचेचाळीस कोटी डॉलर्सच्या व्यवहाराचा हा प्रश्न आहे. तेव्हा हा स्ट्राँग पोलिटिकल प्रॉब्लेम आहे. तो त्याच पातळीवर सोडवता येईल. '

० ० ०

ड्रगला आळा घालण्यासाठी केलेल्या कायद्याविषयी खूप ऐकलं होतं. पुण्याला आल्यावर तो मिळवला. त्याचं नाव ' नारकॉटिक ड्रग्ज ॲंड सायकोट्रोफिक सब्स्टन्सेस ॲक्ट–१९८५ ' असं आहे. त्यातल्या शिक्षेबद्दल तरतुदी वाचल्या. त्यात सत्त्याहत्तर ड्रग्जची यादी दिली असून ती बेकायदेशीर ठरवलेली आहेत. (अपवाद काही ड्रग्जचा, सरकारी परवानगीने उपचारासाठी उत्पादन करण्याचा.) कायद्याची भाषा अगदी नेमकी. जराही पाल्हाळ नसलेली, पण कुठेही संदेह राहू न देणारी. अशी ड्रग्ज जो कोणी तयार करेल, जवळ बाळगील, वाहतूक करेल, परप्रांतात आयात किंवा निर्यात करेल, विकेल, विकत घेईल, उपयोग करील. . . त्याला ' नॉट लेस दॅन ' दहा वर्षं सक्त मजुरी व एक लाख रुपये दंडाची शिक्षा होईल. ही शिक्षा वीस वर्षांपर्यंत वाढवता येईल व दंड दोन लाख रुपयांपर्यंत वाढवता येईल.

देवेंद्र मोहन यांचा मुद्दा याबाबत होता. ' नॉट लेस दॅन ' या शब्दांमुळे जज्जला समोरचा माणूस पाहून शिक्षा सौम्य करायची सोय ठेवलेली नाही.

मी एका पोलिस अधिकाऱ्यास म्हटले की, ' कुणीही ॲडिक्ट खिशातल्या गर्दच्या पुडीसह पकडला आणि कोर्टात जर ते सिद्ध झालं तर त्याला दहा वर्षं आत पाठवणार का ? ' त्यावर ते म्हणाले, ' यातला सेक्शन २७ काढून बघा. ' तो पाहिला. त्याचा गोषवारा असा : एखाद्या माणसाच्या जवळ अतिशय थोड्या प्रमाणात गर्द सापडली आणि त्यानं असं सिद्ध केलं की ही गर्द स्वतःला ओढण्यासाठी जवळ ठेवली होती. दुसऱ्याला विकण्यासाठी नव्हती. (जे सिद्ध करण्याची जबाबदारी आरोपीवर आहे.) तर त्याला एक वर्षापर्यंत तुरुंगवास किंवा दंड किंवा दोन्ही. इथं ' इम्प्रिझनमेंट वुइच मे एक्स्टेंड टु वन इयर ' अशी

शब्दयोजना आहे. ' नॉट लेस दॅन ' अशी नाही.

म्हणजे कायद्यात ॲडिक्टला या व्यसनाचा बळी समजलेलं असून त्याची शिक्षा सौम्य आहे. व्यापार करणाराला कडक शिक्षा आहे.

हे वाचून हायसं वाटलं.

° ° °

के.ई.एम्.मधल्या ग्रूप थेरपी सेशनमध्ये घाटकोपरचा एक तरुण मुलगा सांगत होता, ' मी स्वतःहून तिथल्या हॉस्पिटलमध्ये ॲडमिट झालो. पोलिसांना मी म्हटलं, मी तुम्हाला अड्डा दाखवतो. साहेबांनी दोन हवालदार माझ्या बरोबर दिले. अड्डा जवळ आल्यावर ते म्हणाले,' आम्ही मागे राहतो, तू पुढे जाऊन गर्द मिळते का, विचार.' मी पुढं गेलो. विचारलं. तिथला माणूस म्हणाला, ' दुपारी चार वाजता माल येणार आहे. ' मी परत येऊन हवालदारांना सांगितलं. पण नंतर ते स्वतःच त्या अड्ड्यावर गेले. त्या माणसाशी बोलले. नंतर आम्ही परत दुपारी चारला त्या अड्ड्यावर गेलो. सगळे सावधच होते. काहीच माल सापडला नाही. '

° ° °

मुंबई विद्यापीठातर्फे विद्यार्थ्यांसाठी या विषयावर सेमिनार घेण्यात आला होता. त्यात मुंबईचे पोलिस कमिशनर सोमण आले होते. विद्यार्थ्यांनी त्यांना खूप प्रश्न विचारले. त्यातला एक कॉमन प्रश्न म्हणजे ' सगळ्यांना ड्रग्ज कुठं मिळतात हे माहीत असते, ते पोलिसांना कसे माहीत नसते ? '

यावर सोमण म्हणाले, ' ती या धंद्यातली सर्वांत किरकोळ माणसे असतात. त्यांनाही आम्ही पकडून माहिती काढायचा प्रयत्न करतो. पण बहुतेकांना त्या यंत्रणेची खरोखरच काही माहिती नसते. '

दुसरा प्रश्न असा होता की 'तुम्ही ड्रग्जबद्दलची माहिती देण्यासाठी दिलेल्या फोन नंबरवर फोन केला तरी त्याचा काहीही परिणाम झालेला दिसत नाही. '

त्यावर सोमण म्हणाले, ' असं कसं म्हणता ? प्रत्येक फोनची आम्ही गंभीरपणे दखल घेतो. डी.वाय.एस.पी. लेव्हलचे अधिकारी आम्ही राऊंड द क्लॉक ड्यूटीवर बसवले आहेत. आम्ही मध्ये जो मोठा साठा पकडला—ज्याचे फोटो तुम्ही पेपरातनं पाहिलेत— तो साठा आम्ही अशाच एका निनावी माणसाने फोनवर दिलेल्या टिपमुळे पकडू शकलो. आणि हे लक्षात ठेवा, की ड्रगबाबत आम्ही सीरियस आहोत, पण ते आमच्या अनेक कामांमधले एक काम आहे. मुंबईत रोज अनेक मोर्चे निघतात, संप होतात, मारामाऱ्या होतात, सगळ्या ठिकाणी आम्हाला यंत्रणा गुंतवावीच लागते.

° ° °



माधव कुलकर्णी नावाचे आमचे नेहमीचे पोस्टमन पत्र टाकायला आले की कधी कधी बसतात, गप्पा मारतात. हा विषय निघाला तेव्हा ते म्हणाले, ' मी कॉलेजच्या होस्टेलवर मनिऑर्डरी घेऊन जायचो तर ती मुलं पैशाची चातकासारखी वाट बघत असायची. मी त्यांचं आयडेंटिटी कार्ड पाह्यल्याशिवाय मनिऑर्डर द्यायचो नाही. मग ते माझ्या देखतच त्यांची ब्रीफकेस म्हणा, बॅग म्हणा उघडायचे आणि ते कार्ड शोधायला लागायचे. तर त्यांच्या बॅगेतलं सामान दिसायचं. त्यात सिगरेटच्या चांद्या, टिश्यू पेपरच्या छोट्या छोट्या पुड्या, लाल झाकणाच्या प्लॅस्टिकच्या छोट्या छोट्या बाटल्या. . . त्यावरनं कळायचं. '

° ° °

एक ॲडिक्ट सांगत होता, ' या प्लॅस्टिकच्या छोट्या बाटल्यांचा दिल्लीजवळ कुठंतरी कारखानाच आहे म्हणे. अलिकडे दिवसेंदिवस जाड तळ असलेल्या बाटल्या यायला लागल्यात. त्यामुळे तेवढी पावडर त्यात कमी मावते. हा अगदी पाजीपणा आहे. '

° ° °

चिंचवड–पिंपरी भागातला एक पत्रकार मित्र सांगत होता,' आमच्या भागात एका दारुभट्टीवाल्या बाईमुळे हे गर्दचं व्यसन पसरलं. ती बाई माझ्या ओळखीची. मी तिच्याशी गप्पा मारायला म्हणून गेलो आणि याबाबतीत विचारलं, तर ती म्हणाली, ' आमच्या इथं दारू प्यायला बरीच माणसं येतात, त्यांच्यातल्या काहींना पुढं पुढं दारू चढेनाशीच होते. मग त्यांना आम्ही म्हणतो, ही पावडर घेऊन बघा. म्हणजे किक येईल. ' मित्र पुढे जरा हसून म्हणाला, ' अशा रीतीने तिने आपल्या धंद्याचं आधुनिकीकरण केलं आहे. '

° ° °

एक ट्रक ड्रायव्हर सांगत होता, आमचा धंदाच व्यसनाचा. व्यसनातनं दूर राहूच शकत नाही. दारूनंतर या पावडरचं व्यसन लागलंय. आमच्या धंद्यात हे खूप पसरलंय. कुठं गाडी ब्रेकडाऊन झाली की दुसरे ड्रायव्हर नुसते पाहतात आणि पुढं निघून जातात. पण आपण ही पावडर म्हणा, बाटली म्हणा, असं काही देतो म्हटलं की मग कितीही घाई असली तरी तो ड्रायव्हर गाडी सायडिंगला लावणार. कितीही वेळ गेला तरी दुरुस्त करून देणार. म्हणून आम्ही एक्स्ट्रॉ दोन चार पुड्या जवळ ठेवतोच. '

° ° °

एका पुस्तकात वाचलं, ॲडिक्ट्स बऱ्याचदा गॉगल लावतात. कारण त्यांना ग्लेअर येतो. प्रत्येक रंग हा जास्त भडक दिसतो. त्यावर लेखकाने दुसऱ्या संशोधकाचं मत उद्धृत केलंय. तो म्हणतो, या ॲडिक्ट्सना दिसणारे रंग हेच खरे रंग असतात. अगदी लहानपणी मुलाला तसे रंग दिसतात. पण नंतर मेंदू आपल्या त्या रंगांच्या संवेदना नियंत्रित करून, त्यांचे सौम्य स्वरूप करून घेऊन आकलन करायला शिकतो. ड्रगच्या परिणामामुळे ही नियंत्रणे नाहीशी होतात आणि मूळ स्वरूपात रंग दिसू लागतात.'

वाचल्यावर वाटलं, बाप रे, म्हणजे आपण हे पाहात असलेलं जग खरं नाही तर!

० ० ०

पुण्यातल्या तोफिक नावाच्या रिकव्हर्ड ॲडिक्टला विचारलं, 'ड्रग घेतल्यावर नेमकं काय वाटतं?' तो म्हणाला, 'खरं सांगू का, टर्कीच्या भीतीनं आम्ही इफेक्ट जास्त वेळ टिकावा म्हणून गरजेपेक्षा थोडं जास्तच घ्यायचो. त्यामुळे लगेच 'डार्क'मध्येच जायचो. बहुतेकजण ड्रग घेतल्यावर बसल्याबसल्या कोंबड्यासारख्या माना टाकून बसून राहतात, कारण दे गो इन द डार्क.'

० ० ०

डॉ. आनंद मेहेंदळे हे अमेरिकेतील टेक्सास हॉस्पिटलच्या न्यूरॉलॉजी विभागाचे डायरेक्टर आहेत. पूना सायकियाट्री असोसिएशनने या तरुण डॉक्टरचे हेरॉईन ॲडिक्शन या विषयावर पुण्यात लेक्चर ठेवलं होतं. ते म्हणाले, 'एखाद्या पदार्थाचे ॲडिक्शन का होते आणि दुसऱ्या पदार्थाचे का होत नाही, याविषयी तिकडे खूप संशोधन चालू आहे. आपल्या शरीरातल्या विशेषतः मेंदूतल्या पेशींमध्ये 'ओपियम रिसेप्टार्स' सापडले. त्यावरून असं पुढे सिद्ध झालं की शरीरात मॉर्फिनसारखा पदार्थ मुळी तयारच होतो. त्याला नाव दिलं गेलं, एण्डॉर्फिन. आपला थकवा निघून जातो, चांगलं वाटतं, शरीराला एरवी कितीतरी वेदना झाल्या असत्या पण त्या होत नाहीत याचं कारण हे एण्डॉर्फिनचं सिक्रीशन. जेव्हा बाहेरून आपण मॉर्फिन किंवा हेरॉईन घेतो तेव्हा ते मेंदूतले ओपियम रिसेप्टार्स ब्लॉक करून टाकतं. मग नवे रिसेप्टार्स उघडले जातात. हेरॉईन मग तेही रिसेप्टार्स ब्लॉक करतं. अशी रिसेप्टार्सची संख्या वाढतच जाते. जेव्हा हेरॉईन घ्यायचं आपण थांबवतो, तेव्हा मग हे सगळे रिसेप्टार्स उघडे पडतात. आणि ते हेरॉईनसाठी 'क्रेव्हिंग' करायला लागतात. त्यातनं नॉरएपिनेफ्रिन सिक्रीशन सुरू होतं. मग चेन रिॲक्शन होऊन आपल्याला विथड्रॉल रिॲक्शन येते. त्या क्षणी परत हेरॉईन घेऊ त्याक्षणी ते रिसेप्टार्स ब्लॉक होतात आणि रिॲक्शन थांबते.'



तिकडे याच्यावर काय काय उपाय शोधताहेत असा कुणीतरी प्रश्न विचारला. ते म्हणाले, 'मेथॅडॉन हे ओपियम डेरिव्हेटिव्ह दिले की हेरॉईन किंवा मॉर्फिनचा 'हाय' इफेक्ट येत नाही, म्हणून मेथेडॉन देणारी सेंटर्स तिकडे निघाली आणि खूप गवगवा झाला. आता आढळून आलंय की मेथॅडॉनचंसुद्धा ॲडिक्शन होतं. एक ॲडिक्शन सोडण्यासाठी दुसरं इंट्रोड्यूस केलं जातंय. म्हणून आम्ही काही डॉक्टर्स गव्हर्मेंटच्या मेथेडॉन सेंटर्सविरुद्ध कोर्टात दावा दाखल करून प्रोग्रॅम बंद करावा अशी मागणी करणार आहोत. आणि आता हेरॉईन ॲडिक्शन हा अमेरिकेतला दुय्यम प्रश्न समजला जातो. आता 'क्रॅक' म्हणजे कोकेनचं व्यसन पसरतंय, तो मुख्य प्रश्न होऊन बसला आहे.'

मी मनात म्हटलं, आम्ही कितीही गाठायचं म्हटलं तरी हे अमेरिकन लेकाचे आपल्या पुढंच असतात!

० ० ०

ड्रग ॲडिक्शन प्रसिद्धिझोतात आल्यापासून अनेक संस्थाही नव्यानेच स्थापन झाल्या आहेत. त्यातल्या बऱ्याच संस्था म्हणजे एक–दोन माणसांच्याच आहेत. याविषयी काहीही स्टेटमेंट केले की त्याला प्रसिद्धी मिळते. पुण्यातल्या अशा एका संस्थेने जाहीर केलं की पुण्यात चाळीस हजार विद्यार्थी ब्राऊन शुगर ॲडिक्ट आहेत. त्यावर पोलिस कमिशनर सुधाकर भावे विद्यार्थ्यांच्या एका परिसंवादात म्हणाले, 'पुण्यात विद्यार्थीच मुळी पन्नास हजार आहेत. त्यातले चाळीस हजार ॲडिक्ट असतील का, हे तुम्हीच सांगा.'

मुंबईला एका सेमिनारमध्ये स्वतःला ड्रग ॲडिक्शन स्पेशालिस्ट म्हणवून घेणारे एक डॉक्टर म्हणाले, 'मी गेल्या वर्षात पाच हजार ॲडिक्ट्सना ट्रीटमेंट दिली आहे.' जमलेल्या काहीजणांनी त्यांना चेष्टेने विचारले, 'तुम्हाला मग जेवायला आणि झोपायला वेळ राहात होता का?' त्यांना चेष्टा कळलीच नाही.

परवाच्या पुण्याच्या 'रविवार सकाळ' (९ फेब्रु. ८६) मध्ये कर्वे इन्स्टिट्यूटमधल्या प्राध्यापिका सुनंदा कौशिक यांनी लिहिलं आहे, 'मी बालमानसोपचार केंद्रात काम करीत होते. त्यावेळी १९६५ मध्ये मराठी दुसरीतील एक मुलगा मादक द्रव्यासक्तीच्या उपचारासाठी आला होता. छोकरा श्रीमंत घरचा, अत्यंत प्रसिद्ध शाळेत जाणारा! शाळेबाहेर चण्यामण्या बोरं विकली जात. त्या बोरांवर पसरलेल्या मिठावर ब्राऊन शुगरचा नाजुक भुरा असे! सर्व मुलांना फक्त एकाच विक्रेत्याची बोरे खूप आवडू लागली.'

मी याबाबत डॉक्टर्स, संशोधक यांना विचारलं. त्यांचा एकमुखी निर्वाळा असा : ब्राऊन शुगर इतकी कडू असते की कशानेही त्याची चव झाकली जाऊ

शकत नाही. नशा येण्याइतकी ब्राऊन शुगर पोटात गेली तर त्यामुळे उलटीच होईल. खाऊन किमान नशा यायला स्मोकिंगला लागते त्याच्या कितीतरी पट ब्राऊन शुगर लागेल, तितकी कुणालाच परवडणार नाही.

चण्यामण्यावर ब्राऊन शुगरचा 'नाजुक भुरा' पसरायचा झाला तरी त्या चण्यामण्याच्या एकूण किमतीपेक्षा काही पट पैसे लागतील. ब्राऊन शुगर आपल्या देशात आली तीच मुळी जेमतेम पाच वर्षांपूर्वी. ती पासष्ट साली म्हणजे वीस वर्षांपूर्वी चण्यामण्यावाल्याच्या हातात कशी पडली ?

खा. अमिताभ बच्चन यांनी 'शाळेसमोर आईस कँडीतून ब्राऊन शुगर देतात' अशी लोकसभेत तक्रार केल्यापासून ह्या लोकभ्रमास सुरुवात झाली आणि कौशिकबाईंच्या लेखावरून तो लोकभ्रम आता पक्का झाल्याचंही दिसत आहे.

परवा मी हे लिहीत असताना माझा पुतण्या बनी माझ्याजवळ आला. तो चौथीत आहे. त्यानं विचारलं, 'काका, तू काय लिहितोस ?' मी गमतीनं म्हटलं, 'ब्राऊन शुगरबद्दल. तुला माहीत आहे का ?' तो विचार करीत म्हणाला, 'हो. ती आईसकँडीमध्ये घालतात ना ?'

मी कपाळाला हातच लावला.

० ० ०

रवींद्र सिंग या वीस वर्षांच्या तरुण मुलाने 'आय वॉज अ ड्रग ॲडिक्ट' नावाचं छोटं आणि उत्कृष्ट पुस्तक लिहिलंय. ओरिएंट पेपर बॅक्सने ते प्रसिद्ध केलंय. रवींद्र हा सुप्रसिद्ध गिर्यारोहक ब्रिगेडियर ग्यानसिंग यांचा मुलगा. उत्तमातल्या उत्तम शाळेत असताना त्याला ड्रग्जचं व्यसन लागलं. मनाली, नेपाळ, गोवा इकडं भरकटत गेला. चरस, हेरॉईन, एल्.एस्.डी. अशी सगळी व्यसनं केली. वडलांनी परत आणून ट्रीटमेंट देऊन बरं केलं. त्यानंतर त्याने हे पुस्तक लिहिलं. त्यात त्याने जंकी संस्कृतीचं दर्शनच घडवलंय. त्याने दिल्लीच्या झोपडपट्ट्यांमधून सोशल वर्क केलं. परत निराश होऊ लागला आणि ड्रगमध्ये सापडला. मनालीला ड्रगचा ओव्हर डोस घेऊन मेलेला सापडला. त्याचं वय तेव्हा एकवीस वर्षांचं होतं. त्यानं आधी लिहून ठेवलं होतं, 'आय हॅव फेल्ड ॲज अ सन, ॲज अ फ्रेंड, इन कीपिंग माय वर्ड, इन एव्हरी ब्लेस्ड् वे.'

मला सगळ्यात त्याचं एक वाक्य आठवणीत राह्यलंय, 'ड्रगकडे येणाऱ्यांची कारणं, वाटा वेगवेगळ्या असतील, पण ही लाईन ओलांडून या ॲडिक्शनच्या प्रांतात प्रवेश केला की मग सगळ्यांचा रस्ता सारखाच.'

पुस्तकाला शेवटी रवींद्रच्या वडलांनी 'पोस्ट स्क्रिप्ट लिहिलं. एका होरपळलेल्या वडलांचे ते लिखाण अगदी वाचवत नाही.

० ० ०



नारकॉटिक ॲनॉनिमस (एन्. ए.) या बऱ्या झालेल्या ॲडिक्ट्सनी चालवलेल्या संस्थेच्या मीटिंगमध्ये एक ॲडिक्ट सांगत होता, 'आपण जर ड्रगपासून दूर राहिलो नाही तर आपल्याला दोनच वाटा उरतात. एक म्हणजे मेंटल हॉस्पिटल आणि दुसरी म्हणजे मृत्यू.'

आनंद मागे म्हणाल्याचं आठवलं, 'हे ॲडिक्ट, जर त्यांना कोणी बाहेर काढलं नाही, तर बहुधा पाचेक वर्षांत मरतात. खूप दुबळे झाल्यामुळे साध्या इन्फेक्शनने तरी किंवा ड्रगच्या ओव्हर डोसमुळे तरी. ड्रग ॲडिक्टने मरायचं ठरवलं तर त्यांना मरणं फार सोपं असतं, जास्त ड्रग घ्यायचं.'

एन्. ए. मीटिंगमध्ये सॅम त्याची हकीकत सांगताना म्हणाला, 'ड्रगसाठी मी घरी पैसे मागायचो. आई पैसे द्यायची नाही. मग मी आत्महत्या करतो असा दम दिला की ती घाबरून पैसे द्यायची. असं मी परत परत करू लागलो, तेव्हा ती कंटाळली. परत एकदा मी तसं म्हणताच ती म्हणाली, हे पैसे घे. आणि जाऊन आत्महत्या कर. माझ्यासाठी येवढंच कर, आत्महत्या करण्यापूर्वी खात्री करून घे की तू नक्की मरशील.'

एन्. ए. मीटिंगमध्ये नेहमी सांगून ठसवले जाणारे काही शब्द, वाक्ये आहेत. त्यातला मला महत्त्वाचा वाटलेला शब्द म्हणजे 'हॉल्ट' (HALT). 'एच' म्हणजे हंग्री, 'ए' म्हणजे ॲंग्री, 'एल' म्हणजे लोनली आणि 'टी' म्हणजे टायर्ड. मीटिंग घेणारा हे सांगून पुढे सांगतो, 'आपण भुकेले असतो, रागावलेले असतो, एकटे असतो किंवा दमलेले असतो तेव्हा आपण स्वतःला सांभाळायला पाहिजे. कारण तेव्हाच आपलं व्यसन आपल्यावर कब्जा करू शकतं.'

एक वाक्यही नेहमी ठसवलं जातं, 'वन्स ॲन ॲडिक्ट : ऑलवेज ॲन ॲडिक्ट.'

तोफिक सगळ्यांना सांगत होता,'आपल्याला हा किलर डिसीज झाला आहे. डायबेटिससारखा आहे. डायबेटिस हा कधी बरा होत नाही. तो पथ्य पाळून, औषधं घेऊन थोपवता येतो. तसंच ॲडिक्शनचं आहे. म्हणून यातनं पूर्ण बरे आपण कधीच होऊ शकणार नाही. आपण स्वतःवर सतत लक्ष ठेवून असलं पाहिजे. आपला शत्रू हा गनिमी काव्याने लढणारा आहे. कुठल्या गाफील क्षणी तो कब्जा करेल ते सांगता येणार नाही. एकजण म्हणत होता,'मी गर्द सोडल्याला वर्ष झालं, आता मी कधीच परत त्यात पडणार नाही. शक्यच नाही.' त्यावर मी त्याला म्हणालो,'मग आता काळजी घे. कारण हीच पडायची वेळ आहे.' मित्रांनो, तुम्हाला कधीही गर्द प्यावीशी वाटली तर काहीही करायच्या आधी एक करा, आपल्या एन्. ए.मधल्या मित्राला गाठा आणि हे सांगा.'

० ० ०

# ११

'ड्रग्जविषयी जितकं लिहिलं जातं, तितकं त्याचं ग्लॅमर वाढतच जातं.' असं या क्षेत्रातले जाणकार म्हणतात. ज्यांचा ड्रग्जशी कधी संबंधही आला नसता त्यांना त्याची माहिती होते. कित्येकांची 'काय असतो हा अनुभव? घेऊन बघू या' अशीही प्रतिक्रिया व्हायचा संभव असतो. पण तरीही हा धोका पत्करलाच पाहिजे. ड्रग्जच्या दुष्परिणामांची केवळ माहिती नव्हती म्हणून त्यात ते अडकले अशी बऱ्याचजणांची स्थिती आहे. ते तरी किमान अशा लेखांमुळे टळू शकेल.

काही लोक विचारतात, 'चरस म्हणजेच गर्द का हो?' त्यांच्या माहितीसाठी सांगतो, या ड्रग्जचे मुख्य दोन प्रकार. कॅनाबीस नावाची वनस्पती असते. भारतात ती मुबलक पिकते. झाडाची वाढ पूर्ण झाल्यावर ते उपटून सावलीत वाळवतात. त्याची वरची वरची पानं, फुलं तोडून, कुटून त्याची वस्त्रगाळ पावडर करतात. लिन्सेड ऑईलमध्ये ती पावडर घालून त्यावर हातोडीने बऱ्याच वेळा ठोकून त्याची घट्ट स्लॅब बनवतात. हा चरस ऊर्फ हशीश. या झाडाची कोवळी पाने, अफू एकत्र घोटून 'भांग' करतात. ती शिवाला प्रिय असल्यामुळे शिवरात्रीच्या दिवशी—केवळ शिवाच्या भक्तीच्या उदात्त हेतूपायी—बरेचजण दुधात भांग घोटून तो प्राशन करतात. कॅनाबीसची ही पावडर वस्त्रगाळ करून त्यात देठांचा कचरा राहतो तो तंबाखूबरोबर कुटून त्याचा गांजा तयार करतात. हा चिलमीतून ओढतात. साधू, फकीर लोकांमध्ये हा फार प्रसिद्ध. अनेक महाराजांचे चिलीम तोंडाला लावलेले फोटो आपण पाहतो. त्यांची अनेक पापभीरू मध्यमवर्गीय मंडळी पूजाही करीत असतात. पण त्या चिलमीत बहुदा गांजा असतो ते त्यांना माहीत नसावे. गांजाचा एक दम घेतला की पृथ्वीवरनं एकदम स्वर्गात, अगदी देवाच्या पायाशीच पोहोचता येते.

दुसरा प्रकार म्हणजे अफूचा. अफूची पॉपी नावाची वनस्पती असते. तिच्या कोवळ्या बोंडाला चीर पाडतात व चीक गोळा करतात. तो उन्हात ठेवून थोडा घट्ट केला की त्याची अफू बनते. अफूपासून मॉर्फिन हे वेदना कमी करणारे औषध होते. कोडिन हे वेदनाशामक आणि खोकल्याची ढास कमी करणारे औषध करतात. मॉर्फिनवर एक रासायनिक प्रक्रिया केली की हेरॉईन तयार होते. गर्दमध्ये हेरॉईन हा मूळ पदार्थ असतो.

मॉर्फिन हे प्रभावी ' पेनकिलर ' आहे पण अतिशय ' ॲडिक्टिव्ह ' आहे म्हणून शास्त्रज्ञ त्याच्यातली ॲडिक्टिव्ह शक्ती घालवून फक्त पेन–किलिंग गुणधर्म कायम कसा ठेवता येईल याचा विचार करीत होते. तेव्हा प्रयोगाअंती त्यांना हे ' हेरॉईन ' सापडलं. त्यामुळे शास्त्रीय जगात ती मोठीच घटना ठरली. जगभर ते वापरले जाऊ लागले. पण वापरायला लागल्यावर उलटंच झालं. मॉर्फिनपेक्षाही जास्त याची ॲडिक्टिव्ह पॉवर निघाली. आणि मग सगळीकडनं ते जप्त करण्यात आलं. प्रत्येक देशात ते बेकायदेशीर ठरवण्यात आलं.

पण त्याच्या नशेच्या गुणधर्मामुळे ते व्यसनी लोकांच्या जगात मात्र झपाट्याने पसरलं. आणि अजूनही पसरत आहे.

कॅनाबीस आणि अफू व्यतिरिक्त इतरही अंमली पदार्थ आहेत. एल्. एस्. डी., कोकेन, ॲम्फेटामाईन, मँड्रॅक्स इ. पण ही आपल्याकडे फारच थोड्या प्रमाणात वापरली जातात. आपल्याकडे अलीकडच्या काळात उग्र बनत चाललेलं व्यसन म्हणजे गर्दचं.

गेल्या चारपाच वर्षांपासूनच आपल्याकडे गर्द का मिळू लागलं? यासाठी आपण ड्रग्जचे व्यापारी मार्ग आणि व्यवहार लक्षात घ्यायला हवेत. ब्रह्मदेश, थायलंड, लाओस या देशांतल्या सीमेवरच्या जंगलात अफूचं पीक आणि हेरॉईनच्या डिस्टिलरीज लावल्या जातात. त्यांना ती सरकारे आळा घालू शकत नाहीत. कारण या ड्रग्जवाल्यांच्या स्वतःच्या फौजा आहेत. त्यांच्याकडे स्टेनगन्स, विमानविरोधी तोफा, हेलिकॉप्टर्स आहेत. या साधनांनिशी त्यांच्या आपापसातही एरियावरून लढाया होत असतात. या भागातले प्रमुख केंद्र म्हणजे बँकॉक.

या भागातला माल बँकॉकहून ब्रह्मदेशातून, नेपाळमधून, पाकिस्तान, इराणमार्गे युरोपला जायचा आणि तिकडून अमेरिकेपर्यंत पोहोचायचा. पण गेल्या चारपाच वर्षांत हा मार्ग सोयीचा राहिलेला नाही. अफगाणिस्तान–पाकिस्तानचे युद्ध चालू आहे. इराक–इराणचे युद्ध चालू आहे. तेव्हा हा मार्ग बदलून बँकॉकहून माल डायरेक्ट मुंबईला येऊ लागला आणि तिथून तो युरोप–अमेरिकेकडे जाऊ लागला. त्यामुळे मुंबई हे ड्रग ट्रॅफिकचे मोठे केंद्र बनले. त्यामुळे इथे त्या धंद्यातले मोठे व्यापारी निर्माण झाले. त्यातला काही माल मुंबईतही बाहेर उपलब्ध होऊ लागला आणि त्यामुळे गेल्या चारपाच वर्षांत हे व्यसन मुंबईत पसरले आणि त्यानंतर इतर शहरांत, ग्रामीण भागात पसरत चाललं आहे.

काहीजण म्हणतात, ' पाकिस्तान सरकार मुद्दाम होऊन भारतातली तरुण पिढी बरबाद व्हावी म्हणून हे व्यसन इकडे पसरवीत आहे. ' व्यसनाची इथे बैठक तयार झाल्यावर पाकिस्तानकडूनही इथे माल येत असणार हे उघड आहे. पण



तसा पाकिस्तानातून जास्तीत जास्त माल अमेरिकेकडेही जातो. अमेरिका तर पाकिस्तानचे मित्र राष्ट्र आहे. येवढंच काय, खुद्द पाकिस्तानातही ड्रग ॲडिक्ट्सची संख्या झपाट्याने वाढत असल्याचेही अधिकृत पाहणीवर आधारित रिपोर्टस् आहेत. तेव्हा ड्रग उत्पादकांचं एक वेगळंच जग आहे, त्यांची सरकारला समांतर यंत्रणा तयार झालेली आहे. आणि ते सर्वच बाबतीत विधिनिषेधशून्य आहेत.

एक गोष्ट मात्र जगभर दृष्टीस पडत आहे, ती ही की दहशतवादी संघटना पैसे उभे करण्यासाठी सर्रास या ड्रग्जच्या धंद्यात पडत आहेत. या मार्गाने झटपट पैसा उभा राहतो, धंद्यासाठी त्यांच्याकडे माणसं भरपूर उपलब्ध असतात. धंद्यास लागणारी वाहने, शस्त्रे इ. साधने असतात. ही अलीकडच्या काळात या धंद्याला मिळालेली राजकीय बाजू आहे.

जगातील संपन्न राष्ट्रांकडे समर्थ पोलिस यंत्रणा, ड्रग्ज हुडकून काढण्याची आधुनिक यंत्रे,पैसा असूनही कुठलाही देश ड्रग्जला आळा घालू शकलेला नाही. परवाच्या ' न्यूजविक 'मध्ये मेक्सिकोतून अमेरिकेत प्रचंड प्रमाणात ड्रग्ज येतात त्याबद्दल माहिती आहे. लॉस एंजलीसचा प्रमुख पोलिस अधिकारी असं हताशपणे म्हणालाय, ' आम्ही ड्रग्जबरोबरची लढाई हरलेलो आहोत.' मेक्सिकन सरकारने ड्रग्जवाल्यांना आळा घालावा म्हणून कित्येक मिलियन डॉलर्स अमेरिकन सरकार देते, पण मेक्सिकन सरकार त्याबद्दल काही करत नाही. याबद्दल जाब विचारल्यावर मेक्सिकन अधिकारी म्हणतात, ' जोपर्यंत अमेरिकेतून ड्रग्जला मागणी आहे तोपर्यंत ड्रग्ज ही तिकडे जाणारच. आम्ही हजार मैलांची सीमा ब्लॉक करू शकत नाही.' कम्युनिस्ट राष्ट्रांचा अपवाद सोडला तर या धंदेवाल्यांनी त्या त्या देशातल्या पोलिस यंत्रणा, न्याययंत्रणा पोखरून टाकलेल्या आहेत.

एक अमेरिकन मित्र सांगत होता, ' आमच्याकडे क्रॅकचं (कोकेनचं) व्यसन पसरतंय. पण आम्ही त्याची फार काळजी करत नाही. कारण हेरॉईनचा धंदा करणारी ' माफिया फॅमिली ' अतिशय स्ट्राँग आहे. ती क्रॅकचा धंदा करणाऱ्यांना ' पाहून ' घेईल. अमेरिकन सरकारने दोघांपुढेही हात टेकलेलेच आहेत. '

आपल्याकडे आत्ता आत्ता या धंद्याचा जम बसतो आहे. अजूनही वरिष्ठ दर्जाचे पोलिस अधिकारी या धंद्याविरुद्ध मनापासून काम करताना दिसतात. पण हे दृश्य पुढच्या काळात टिकेलच असं नाही. आनंद नाडकर्णी पोलिस खात्यातील, कस्टम खात्यातील अधिकाऱ्यांची, शिपायांची शिबिरं घेतो तेव्हा दोन बऱ्या झालेल्या ॲडिक्ट मुलांना बरोबर घेऊन जातो. ही मुलं म्हणजे दोन वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्यांची मुलं आहेत. त्यांना बोलायला लावून नंतर आनंद सांगतो, ' बघा,

समाजात हे व्यसन पसरलं तर आपल्याही मुलांना लागू शकेल. त्याचे दुष्परिणाम हे बघा.' त्याचा खूप प्रभाव पडतो.

आपल्या समाजात हे व्यसन का पसरतंय? याची कारणं बरेचजण देत असतात. सायकॉलॉजीच्या पुस्तकात तर कारणांची यादीच दिलेली असते. कडक आईवडील, आईवडलांमधला बेबनाव, फुटलेली घरं, अती लाड, अती उपेक्षा, भवितव्याविषयी असुरक्षितता अशी अनेक कारणं आहेत. रवींद्र सिंगने लिहिलेल्या आत्मकथेत त्याचे वडील सतत माऊंटनियरिंगच्या मोहिमांवर असायचे आणि आई टिपिकल मिलिटरी क्लब लाइफमध्ये गुंतलेली असायची, असे कारण दिलेले दिसते.

आज मध्यम किंवा उच्च थरात मुलांकडे या रीतीचं दुर्लक्ष होतं हे खरंच आहे. विमानाने भारतभर किंवा जगातही अनेक ठिकाणी फिरणारा उद्योगपती किंवा त्यांच्या अधिकाऱ्यांचा मोठा वर्गच तयार झाला आहे. हे सारख्या मीटिंगा करीत इकडून तिकडे फिरत असतात. घरी आले तरी फायलींचे गठ्ठे घरी घेऊन येतात. काही उद्योजकांच्या घरी त्यांच्या कस्टमर्सना आठवड्यातनं दोनचारदा तरी पार्ट्या होतात. त्यांच्या घरात एकमेकांशी फारसं बोलणं होतच नाही. या सगळ्यात मुलांकडे दुर्लक्ष होतं. फॉरेनहून आल्यावर एखादं महागडं खेळणं त्याच्यापुढे आणून टाकलं की आपली बाप म्हणून ड्यूटी संपली असंच बहुतेकजण मानतात. अतिशय संपन्न घरात वाढूनही कुठलाही जिव्हाळा न मिळाल्यामुळे ही मुलं व्यसनाकडे लवकर ओढली जाऊ शकतात. रवींद्र सिंगने म्हटलं आहे, वडील टेन्शन घालवण्यासाठी जर ड्रिंक घेतात तर मी एक पफ् मारला तर काय हरकत आहे? असा विचार मुलाच्या मनात येतो.

एखाद्या कडक बापाविरुद्ध बंड म्हणून मुलं व्यसनाकडे वळतात. घरात चाललेले भ्रष्टाचारासारखे, भंपकपणाचे प्रकार पाहून मुलांना बंड करावंसं वाटतं. पण ते करण्याची कुवत नसते, त्यातून ते व्यसनाकडे जातात. येरवड्याच्या मेंटल हॉस्पिटलमध्ये एका वरिष्ठ आणि भ्रष्ट पोलिस अधिकाऱ्याचा ड्रग ॲडिक्ट मुलगा ॲडमिट होता. वडील पोलिसच्या त्यांच्या खास कारने यायचे. पोलिस दार उघडून द्यायचा. मेंटलमधले कर्मचारीही त्यांना सलाम ठोकायचे. पण मुलाला ते त्याच्या खोलीत भेटले की मुलगा खच्चून शिव्या द्यायचा. ते चेहरा पाडून ऐकून घ्यायचे. कारण वडलांचे सगळे व्यवहार तो घरी समक्षच पाहायचा. वडलांविषयी किंचितही आदर त्याला नव्हता. वडलांनाही त्याला बोलायचा अधिकार राहिलेला नव्हता.



हे झालं वरच्या वर्गातलं वातावरण. खालच्या थरातलं वातावरण हे के.ई.एम्.मधल्या ओ.पी.डी.तल्या केसेस, झोपडपट्ट्यांमधले व्यसनी पाहून समजलेलंच आहे. पण ही काही व्यसनाची कारणं नव्हेत. ती व्यसनांना पार्श्वभूमी पुरवत असतील. कारण ही कारणं यापूर्वीही या समाजात होतीच. बहुतेक मुलं आईवडलांवर या ना त्या कारणाने नाराज असतच, किंवा आईवडील काही या काळातच भांडतात आणि पूर्वी भांडत नव्हते असं नाही. तरी तेव्हा व्यसन पसरले नाही आणि आताच का पसरले?

मला वाटणारे प्रमुख कारण म्हणजे या हेरॉईन या द्रव्याचा माणसाला झपाट्याने व्यसनी बनवण्याचा गुणधर्म. आतापर्यंत दारूपासून गांजापर्यंत जेवढी म्हणून व्यसनं या समाजात होती त्यापेक्षा हे व्यसन हे अगदी मुळातच वेगळे आहे. दारू, चरस इ. पदार्थांचे व्यसन हे प्रामुख्याने मानसिक व्यसन आहे. आणि हेरॉईन ऊर्फ गर्दचे व्यसन हे प्रामुख्याने शारीरिक आणि काही प्रमाणात मानसिक आहे. डॉ. मेहेंदळे यांनी त्यांच्या लेक्चरमध्ये सांगितले तसे शरीरात हेरॉईन चारपाचदा गेले तरी पेशीपेशीत जाऊन बसते, आणि त्यातून शरीरच हेरॉईन मागू लागते. अनेक तरुण मुलं कॉलेजात असताना दारू पितात. ट्रीपला पानात बंट्याच्या गोळ्या घालून न सांगता मित्रांना चारतात आणि त्याची मजा बघतात. शिवरात्रीचा भांगेचा प्रसादही चाखलेले अनेकजण आहेत. पण यातले फार थोडे व्यसनी बनतात. कधीतरी पार्टीत दारू पिणारे लोक आहेत. किंवा रोज एक पेग घेणारे पण तरीही व्यसनी न झालेलेही लोक आहेत. गर्दच्या बाबतीत तसे होत नाही. रोज गर्दची एकच सिगरेट ओढतो आणि वर्षानुवर्षे अशी काढलीत असे उदाहरण जगात अजूनतरी कुठे कुणाला आढळले नाही. आज जेवढे घ्याल त्यापेक्षा उद्या थोडे गर्द जास्तच घ्यावे लागणार. आणि तितके न घ्याल तर टर्कीचा त्रास होईल. त्यापेक्षा जास्त घ्याल तरीही उलट्या होतात. म्हणजे शरीर मागेल तेवढेच गर्द घ्यावे लागते. तो माणूस या गरजेचा गुलाम होऊन जातो. आणि पुढचा रस्ता ठरलेलाच असतो.

म्हणून ज्या मुलांच्या बाबतीत काहीही कौटुंबिक, मानसिक गंभीर कारणं नाहीत अशी मुलंही केवळ फॅशन किंवा चुश्त म्हणून गर्द घ्यायला जातात आणि त्यात अडकतात. ज्यांच्या बाबतीत मानसिक कारणं आहेत, ते यात सापडण्याची शक्यता जास्त हे खरं आहे. पण यातून गणिती फॉर्म्युला मांडता येणार नाही.

हेरॉईनचा हा विशेष गुणधर्म आणि आता आपल्याकडे अशा पदार्थांची जागोजाग उपलब्धी या दोन गोष्टी इथं एकत्र आल्या. त्याला इथल्या सांस्कृतिक, सामाजिक वातावरणाची मदत झालीय. गेल्या काही वर्षांत समाजाचे सांस्कृतिक

अध:पतन वेगाने चालू आहे. ' करियर हेच सर्वस्व ' हे इथल्या मध्यमवर्गाचे तत्त्वज्ञान झाले आहे. कुठल्याही मार्गाने पैसा मिळवा, पैसा असेल तर जग विचारतं, असे विचार लोक सर्रास मांडतात. इंजिनियर मुलाच्या लग्नाच्या बैठकीत त्याचे वडील वधुपक्षाला सरळ सांगतात, ' मुलाला पगार दोन हजार असला तरी त्याच्यावर जाऊ नका, त्याची जागा अशी आहे की घर चालत महिना दहा हजार रुपये येतात. ' पूर्वी इंपोर्टेड वस्तू बघायला मिळायच्या नाहीत, आता त्या दुकानादुकानातून मुबलक मिळू लागल्या आहेत. जी खेडी पूर्वी ' माळकऱ्यांचं गाव ' म्हणून ओळखली जायची तिथं एस्. टी. पोहोचली नसली तरी व्हिडिओ पोहोचला आहे. त्यावर सेन्सॉर न केलेले हिंदी सिनेमे, परदेशातनं स्मगल् करून आणलेल्या ब्ल्यू फिल्म्स माळकऱ्यांची मुलं मिटक्या मारीत बघत आहेत.

या सगळ्याबरोबर व्यसनांचं प्रमाण झपाट्याने वाढत आहे. रस्त्याच्या कडेला चिखलात लोळत पडलेले दारुडे हे दृश्य आता नेहमीचे झाले आहे. माझ्या लहानपणी असे दृश्य नक्कीच दिसत नव्हते. वरच्या स्तरातल्या लोकांच्या घरी गेलं की काय चहा घेणार का ? असं विचारण्याऐवजी ' लेट्स हॅव सम बियर !' असं सर्रास म्हटलं जातं. उद्योगपतींच्या लग्नात रिसेप्शनला कॉकटेल ठेवलं जातं.

हे बदललेलं सांस्कृतिक वातावरण गर्दच्या व्यसनास पोषक ठरलं. तशीच ढासळती आर्थिक स्थितीही. पण ' गर्दच्या व्यसनास आळा घालायचाय ना, मग या मागच्या कारणांचा बंदोबस्त करा, म्हणजे आपोआप प्रश्न सुटेल ', असं कुणी म्हणू लागलं तर तेही बरोबर होणार नाही. कारण ही व्यापक कारणं दूर करणं हे काही दोनपाच वर्षांचं काम नाही. त्यासाठी फार मोठी संघटना, कुशल नेतृत्व अशा अनेक गोष्टी एकत्र याव्या लागतील. ते कुणाला जमणार ? मग जमणार नसेल तर मग काहीच करायला नको अशी वृत्तीच त्यातनं पसरेल. म्हणून ही मागची कारणं आपण लक्षात असू द्यावीत. पण प्रत्यक्ष काम मात्र गर्दच्या उपलब्धीला आळा घालणं, व्यसनाच्या धोक्याची जाणीव समाजाला देत राहणं आणि व्यसनी तरुणांना त्या व्यसनातून बाहेर काढायचा प्रयत्न करणं अशा अगदी व्यावहारिक पातळीवरच करावं लागेल.

यातील गर्दच्या उपलब्धीला आळा घालण्याबाबतही आपण फार थोडं करू शकतो. एकतर हा आंतरराष्ट्रीय बेकायदेशीर व्यापाराचा प्रश्न आहे. किडलेली पोलिस यंत्रणा काही एका रात्रीत सुधारू शकणार नाही. पण आपण सरकारवर, पोलिसांवर दबाव आणू शकतो. आपल्याला माहीत असलेली गर्द मिळण्याची ठिकाणं पोलिसांना कळवावीत. भीती वाटत असली तर निनावी पद्धतीने फोनवर तरी कळवत राहायला पाहिजे. त्याचा काही ना काही नक्की फायदा होतो. अशा



ठिकाणांसमोर तरुणांच्या संघटनांनी निदर्शने करण्याचीही आवश्यकता आहे.

व्यसनाविरुद्धच्या प्रचारातही काही नवी दृष्टी आली पाहिजे असं वाटतं. या विषयासाठी तयार केलेले काही स्लाइड शो मी पाहिले. त्यात इंजेक्शनमार्फत घेण्यात येणारं हेरॉईन, एल्. एस्. डी., ॲम्फेटामाईनसारख्या ड्रग्जचं व्यसन असं बरंच काही दाखवलं होतं. सिंबॉल म्हणूनसुद्धा फुटलेल्या सिरिंजेस, ॲम्पुल्स दाखवल्या होत्या. हे दोन्ही प्रकार भारतात जवळपास नाहीतच. परदेशात तयार झालेले प्रचार साहित्य पाहून त्याची नक्कल करण्यात अर्थ नाही. इथल्या व्यसनाचं स्वरूप आपण प्रत्यक्ष लोकांमध्ये जाऊनच पाहिलं पाहिजे आणि ते इतरांसमोर ठेवलं पाहिजे.

प्रचारात आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषेची. आज बहुतेक सगळे स्लाईड शोज, फिल्म्स, पत्रिका, पुस्तिका, पोस्टर्स हे इंग्लिशमध्ये केलेले आहेत. पुण्यात नारकॉटिक ॲनॉनिमसची मीटिंग इंग्लिशमध्येच चालते. गर्दच्या व्यसनातून बाहेर पडलेल्या काही तरुणांना मी तिथं घेऊन गेलो. ओळख करून दिली. पण त्या इंग्रजी वातावरणामुळे ते तिथे टिकले नाहीत. काही संस्थांचे कार्यकर्ते या विषयावर शाळांमधून जाऊन भाषणं देतात, तीही इंग्रजीत. डॉ. आनंद नाडकर्णी आणि डॉ. राजेंद्र बर्वे हे दोघंच काय ते वक्ते आहेत की जे ठिकठिकाणी जाऊन मराठीत भाषणं देतात. पूर्वी हा प्रश्न एलिट वर्गापुरता मर्यादित होता. त्या वेळी इंग्लिश भाषा सोयीची पडतही असेल. पण आता प्रश्न सर्व थरांत पसरल्यामुळे ती गैरसोयीची झाली आहे.

कॉलेजाकॉलेजांमधून हे व्यसन वाढत असताना कॉलेजचे प्राचार्य, प्राध्यापक उदासीन दिसतात. मला हळूच विचारतात, ' काहो, आमच्याही कॉलेजात हे व्यसन करणारी मुलं आहेत ? ' प्राचार्यांनी या बाबतीत निर्भयपणे पुढाकार घ्यायला हवा. गर्दचा पुरवठा करणाऱ्या मुलांवर ॲक्शन घेण्यासाठी जरूर तर जादा अधिकार प्राचार्यांना दिले पाहिजेत. व्यसनात अडकलेल्या मुलांना एकत्र करून त्यांच्या मीटिंग्ज घेऊन त्यांना त्यातून बाहेर पडण्यासाठी मन वळवले पाहिजे.

बहुतेक अल्कोहोलिक किंवा नारकॉटिक्स ॲनॉनिमसच्या मीटिंग्ज चर्चच्या आवारात होतात. मी याचं कारण विचारलं. एक ए. ए. चा कार्यकर्ता म्हणाला, ' आम्ही काही मंदिराच्या ट्रस्टीजनाही जागेसाठी विचारायला गेलो होतो. पण ते म्हणाले, ' तुम्ही व्यसनी लोक, मंदिराच्या आवारात तुम्ही गोंधळ घालाल '. आठवड्यातून एकदा किंवा दोनदा तेही संध्याकाळी दोन तासासाठी हॉल द्यायला

आपल्या समाजातलं कुणी पुढे येऊ नये, ही नामुष्की आहे. कॉलेजांनी अशी जागा द्यायला काय हरकत आहे ?

० ० ०

लोक विचारतात, 'काहो, गर्दमधून बाहेर पडायला काही औषध आहे का ?'

दारू सोडण्यासाठी अॅन्टॅब्यूज किंवा अस्पेरॉल नावाचं एक औषध आहे, त्यावरून हा प्रश्न लोक विचारत असावेत. दारूच्या व्यसनी माणसाची हॉस्पिटलमधे रक्त, ब्लडप्रेशर, वगैरे पूर्ण तपासणी करतात आणि नंतर अॅस्पेरॉलची गोळी देतात. ती गोळी घेतल्यावर नंतर लगेच तो नेहमी घेतो त्या ब्रँडची दारू त्याला प्यायला देतात. ही दारू आणि ती गोळी यांच्या मिश्रणाने शरीरात एक प्रकारचे विषद्रव्य तयार होते. आणि त्या वेळी त्या माणसाला त्याचा भयानक त्रास होतो. नंतर वर्षभर किंवा कमी अधिक काळ ती गोळी चालू ठेवतात. माणसाला पहिल्या अनुभवातून दारूविषयी घृणा आणि भीती निर्माण झालेली असते. ते वर्षभर तो दारूच्या बाबतीत कोरडा राहू शकतो. त्या काळात त्याला सायकोथेरपी दिली तर त्याचा फायदा होऊ शकतो.

गर्दच्या बाबतीत असा काही अँटिडोट अजूनतरी सापडलेला नाही. ते व्यसन थांबवणं आणि थांबल्यावर टर्कीचा त्रास होईल तो ट्रीट करणं हा उपचारातला मोठा भाग आहे. यात काही डॉक्टरांचं म्हणणं की गर्द एकदम बंद न करता हळूहळू कमी करत ते बंद करणं हे जास्त हिताचं. कारण तो करताना त्याला स्वतःचा संयम वापरावा लागतो. त्याचे स्वभावाला चांगले वळण मिळू शकते. तर काही डॉक्टरांचे म्हणणे तुमच्याकडे पेशंट आल्यावर त्याला एकदमच गर्द सोडायला लावायची. जो त्रास होईल तो कमी करता येईल तेवढा करायचा.

माझ्या दृष्टीने दुसरा मार्ग जास्त श्रेयस्कर. कारण स्वतःहून संयमित राहून कमी करण्याइतकी परिपक्वता फार थोड्या तरुणांमधे असते. आणि एरवीसुद्धा अनेक तरुण मुलं स्वतःहून व्यसन कमी करायचा आपणहोवून प्रयत्न करीत असतातच. पण त्यांना ते जमत नाही. म्हणून अॅडमिट होऊन सोडणं हे हिताचं. त्यात फायदा असा की त्यांच्या व्यसनाच्या प्रवासात हॉस्पिटलचा अनुभव ही तो प्रवास संपण्यासाठी एक घटना होते. अॅडमिट झाल्यावर आधी एका ठिकाणी म्हटल्याप्रमाणे काही डॉक्टर्स इतक्या झोपेच्या गोळ्या देतात की त्याला टर्कीचा



त्रास झालेला समजतही नाही. हेही करणं चूक आहे. अगदी जीवघेणा अनुभव नको, पण निदान लक्षात राहील इतपत त्या अनुभवाची आठवण त्याला राहिलीच पाहिजे. पुढे तो ड्रगपासून दूर राहायला त्याची मदत होते.

गर्दमधे बड्याबड्या कारखानदारांची, सिनेनटांची मुलं अडकली आहेत. तेव्हा यात भरपूर पैसा आहे हे ओळखून काही जनरल प्रॅक्टिशनर्सनी या क्षेत्रात घुसून भरपूर पैसा मिळवला आहे. स्वतःच्या नर्सिंग होममध्ये, स्वतःच्या बेडरूममधे अॅडमिट करून, वडलांच्या प्रतिष्ठेला धक्का न लागण्यासाठी हे क्रियाकर्म ते गुपचूप उरकतात. त्याबद्दल मी ऐकलेला फीचा जास्तीत जास्त मोठा आकडा चाळीस हजाराचा आहे. आणि नंतर ते पेशंट डिसचार्ज करून त्याचा फॉलोअप ठेवत नाहीत, त्याला वाऱ्यावर सोडून दिले जाते. मग परत रिलॅप्स होतो. परत दुसरा असाच डॉक्टर.

बरीच मुलं चुश्त म्हणून व्यसनाकडे वळत असली तरी सर्वांच्याच बाबतीत हे खरं नसतं. मी आनंदच्या ओ. पी. डी.त बसलो असताना आनंद एका तरुणाची हिस्टरी घेत होता. माझ्याकडे वळून इंग्रजीत म्हणाला, 'हा नुसता अॅडिक्ट नाही तर हा स्किझोफ्रेनिक दिसतोय.' असं म्हणून त्याची नंतर सविस्तर चिकित्सा केल्यावर तो स्किझोफ्रेनिकच निघाला. त्याला त्याच्या मूळ कारणासाठी आधी ट्रीटमेंट सुरू केली आणि नंतर गर्दसाठी.

तेव्हा काहींच्या बाबतीत त्यांचं गर्दचं व्यसन हे त्यांच्या मानसिक रोगाची फक्त एक 'सिम्पट्म' असते. मानसिक रोगाकडे दुर्लक्ष करून नुसत्या गर्दसाठी त्याला कितीही वेळा अॅडमिट केलं तरी तो परत परत व्यसनाकडे वळणारच. म्हणून जनरल प्रॅक्टिशनरचा हा सर्वस्वी विषय नाही. प्रत्येक केस ही सायकियाट्रिस्टने पाहायला हवी. मूळ कारण मानसिक रोग नसेल तरच इतर डॉक्टरांनी ती ट्रीट करावी.

या क्षेत्रातल्या अनुभवी माणसांचं एक प्रसिद्ध वाक्य आहे की, 'व्यसन सोडणं सोपं आहे पण सोडलेलं टिकणं फार अवघड आहे.' जगात सगळीकडे या व्यसनाच्या बाबतीत फारच निराशाजनक अनुभव आहे. हिरॉईनग्रस्त लोकांच्यासंबंधी जगभर झालेल्या पाहण्यांच्या ढोबळमानाने निष्कर्ष असा की व्यसनी लोकांपैकी ऐंशी टक्के लोक परत परत व्यसनात अडकत राहतात. तर फक्त वीस टक्के लोक पूर्णपणे बाहेर पडू शकतात. काही लोकांच्या मते हाही आकडा चार टक्के इतका कमी आहे. कारण बहुतेक पाहण्या हॉस्पिटलमधे ट्रीटमेंटसाठी आलेल्या लोकांमधून झालेल्या आहेत. हॉस्पिटलकडे न आलेल्यांची संख्या पाहिली तर बरं होणाऱ्यांच्या प्रमाणाचा आकडा आणखी घसरतो.

मी गेले काही महिने आनंद नाडकर्णीचे ओ. पी. डी. पेशंटस् पाहिले, त्यांची घरं, नातेवाईक, मित्र पाहिले. मला परदेशापेक्षा आपल्याकडे बरे व्हायचे प्रमाण तितके निराशाजनक नाही असे वाटते. याची काही प्रमुख कारणे अशी : एक म्हणजे संपन्न देशातले ॲडिक्ट्स् इंजेक्शनवाटे हिरॉईन घेतात. त्यामुळे त्यांचे ॲडिक्शन हे खूपच तीव्र स्वरूपाचे असते. जे सिगरेट किंवा चेसिंग करून घेतात तेही हिरॉईनची प्युअर पांढरी पावडर वापरतात. आपल्या देशात इंजेक्शनने घेणाऱ्यांचे प्रमाण नगण्य. जे स्मोकिंगवाटे घेतात तेही गर्दच्या स्वरूपात. गर्दच्यामधे असलेल्या भेसळीचे अनेक दुष्परिणाम शरीरावर होत असले तरी एक चांगला परिणाम म्हणजे त्यात हिरॉईनची पावडर थोडीच असते. गर्द खूप महाग असल्याने जे थोडे घेतले जाते, त्यातही हिरॉईनचे प्रमाण जवळपास दहाबारा टक्केच असल्याने त्याची तीव्रता तिकडल्यापेक्षा इकडे कमी आहे.

पाश्चात्य देशांत मुलं आईवडलांपासून आपल्या इकडल्यापेक्षा बरीच लवकर सुटी होतात. हे व्यसन लागायचं जे टिपिकल वय आहे त्या वयात ती मुलं होस्टेल किंवा अन्य ठिकाणी म्हणजे कुटुंबाबाहेर राहात असतात. त्यामुळे येणारा एकाकीपणा हा व्यसनास पोषक असतो. आपल्याकडे एकूण विद्यार्थ्यांमधली फार थोडी मुलं होस्टेलमधे राहून शिक्षण घेतात. बहुतेक आपापल्या कुटुंबात राहून शिकतात. खेड्यातून आलेली मुलंसुद्धा नातेवाइकांकडे राहून शिकत असताना आपण पाहतो. म्हणजे ती मुलं पालकांच्या डोळ्यासमोर असतात. डोळ्यासमोर असूनही मुलं व्यसनाला लागल्याचे काहींच्या लवकर ध्यानात येत नाही, हे सोडा. पण त्यांच्यावर तिकडल्यापेक्षा इकडे निश्चितच वडीलधाऱ्यांचा दाब अधिक आहे. त्यामुळे इकडे व्यसन लागण्याची शक्यता कमी आणि व्यसन लागलंच तर ते पालकांना लवकर समजण्याची शक्यता जास्त असते.

तिकडे ड्रग्जला ग्लॅमर होतं. अनेक पॉप म्युझिकवाले सिनेमातले नट हे ड्रग्ज घेत. म्हणून त्यांच्याशी मनाने एकरूप होऊ पाहणाऱ्या पिढीत ड्रग्ज घेणे हा अभिमानाचा विषय झाला. एका पॉपसिंगरची केस एका पुस्तकात दिली आहे. तो हिरॉईन ॲडिक्ट होता. हॉस्पिटलमधे आणल्यावर डॉक्टरांनी ठरवले की डोस हळूहळू कमी करत न्यायचा. म्हणून तशी कल्पना देऊन त्याला त्यांनी डोस विचारला. तो म्हणाला, ' मी हिरॉईनचा इतका इतका कमीच डोस घेत आहे. पण हे प्लीज बाहेर कुठे सांगू नका. कारण मी हेवी डोस घेतो अशी बाहेर प्रसिद्धी आहे. आणि जर त्यांना कळलं की मी कमी डोस घेत होतो तर माझी प्रतिष्ठा धुळीला मिळेल. '



व्यसनाला अशी प्रतिष्ठा आपल्याकडे आजतरी नाही.

त्यांच्या देशात एखादा मुलगा व्यसनी झाला की तो समाजाबाहेरच फेकला जातो. मग असे ' जंकी ' ग्रूप करून राहतात. त्यांच्या अशा सामुदायिक राहण्याच्या जागांना ' डेन ' (गुहा) म्हणतात. तिथं तरुण मुलं-मुली एकत्र राहतात. पाश्चात्य परीटघडीच्या जीवनपद्धतीविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून ते मुक्त जीवन जगतात. मुक्त सेक्स, मुक्त संगीत याची जोड त्या व्यसनाला मिळते. तिथे ड्रग्ज खूप महाग म्हणून चरस किंवा अफू जिथे पिकते तिथं ती स्वस्त मिळते म्हणून ते पूर्वेकडच्या देशांमधे येतात. नेपाळ, भारत, पाकिस्तान, आग्नेय आशिया इकडं फिरणारी त्यांची भटकी संस्कृतीच बनते. भारतात त्यांनी अशी निवांत ठिकाणंही शोधून काढली. मनाली, गोवा, नेपाळमधलं काटमांडू. ही मंडळी अनेक ड्रग्जचे एकाच वेळी ॲडिक्ट असतात. हशीश घेणारा मधूनच एल्. एस्. डी.च्या ट्रिप्सही मारतो. या ट्रिप्समध्ये माणसं इमारतींच्या वरच्या मजल्यावरून किंवा डोंगराच्या कड्यावरून, आपल्याला उडता येतं या भ्रमाने सरळ उड्या मारून पडून मेल्याची कितीतरी उदाहरणं आहेत.

आपल्याकडे हिरॉईन ऊर्फ गर्दचं व्यसन पसरलं असलं तरी ही जंकी संस्कृती निर्माण झाली नाही. इथं त्याला तसं ग्लॅमर नाही. मुक्त जीवनाचं त्याला अंग नाही. इकडे मुलींमधे हे व्यसन जवळपास नसल्यातच जमा आहे. माझ्या पाहण्यात उच्चभ्रू संस्कृतीतल्या एक दोन मुली आल्या तेवढ्याच. कामाठीपुऱ्यातल्या वेश्या ही एक वेगळी कॅटगरी आहे. ती स्त्रियांच्या बाबतीत प्रातिनिधिक म्हणता येणार नाही. मुली यात नसण्याचं मोठं कारण मुलींमधे सिगरेट ओढणाऱ्यांचं प्रमाण नगण्य आहे. आणि गर्दच्या बाबतीत सिगरेट हेच प्रमुख वाहन आहे. मुलींवर असलेली कुटुंबातली बंधनं इतर काही बाबतीत अनिष्ट असली तरी या व्यसनाच्या दृष्टीने ते आटोक्यात राहायला त्यामुळे मदत झाली आहे.

आपल्या समाजाची ठेवण वेगळी असल्याने पाश्चात्य समाजापेक्षा आपली या व्यसनाबद्दल वेगळी प्रतिक्रिया उमटली आहे असे दिसते. घरात एखादा मुलगा व्यसनी असल्याचे लक्षात आल्यावर त्याला कुणी लागलीच रस्त्यावर फेकून देत नाही. घाटकोपरच्या त्या बाईंनी तर भाबडेपणाने ते सुटण्यासाठी देवदेवस्कीही केली. मुंबईच्या काही लोकांनी अशी व्यसनी मुलं आपापल्या खेडेगावी चार-सहा महिन्यांसाठी पाठवून दिल्याची उदाहरणे दिसली. व्यसनी मुलाला बाहेर काढायला अनेक माणसं आपण होऊन पुढं येताना दिसतात. सायन कोळीवाड्याचे अहिरे, भायखळ्याचा अंकल, घाटकोपरचे सोनावणे मामा, महालक्ष्मीचे प्रेमजीभाई, किंवा माहीमची आंटी, गणेश अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. ओ.पी.डी.त

पेशंटला घेऊन येणाऱ्यात आई, वडील, भाऊ, मित्र असे अनेक जण असायचे. 'काय संकट आमच्यावर आलंय बघा, हा मुलगा आधी इतका चांगला होता. पण या नादानं कसा बिघडला. त्याला दुरुस्त करा.' असं परत परत सांगायचे. हे सगळं पाहता त्या देशांपेक्षा इकडे आशेला जास्त जागा आहे असं वाटतं.

समाजातल्या खालच्या थरात व्यसनी मुलाच्या बाबतीत जी प्रतिक्रिया होते तशी मध्यम व उच्च वर्गात होत नाही. तुमचा मुलगा ड्रग ॲडिक्ट आहे असं कुणी कळवलं तर पहिली प्रतिक्रिया म्हणजे ते नाकारणे. आमचा मुलगा असा असणं शक्यच नाही, आमच्या बदनामीसाठीच तुम्ही हे पसरवताय, असं बरेच जण म्हणतात. काहीजण इतके गडबडून आणि हबकून जातात की आपण याबाबत काय करायला पाहिजे याचा विचारच ते करीत नाहीत. काही जण त्या मुलाला दोषी ठरवून इतकं बोलतात की तो मुलगा आणखीनच व्यसनात लोटला जातो. काही माणसं स्वतःला दोष देत बसतात. या सर्व प्रतिक्रिया होणं साहजिक असलं तरी मुलाला बाहेर काढण्यासाठी त्या निरुपयोगी आहेत. योग्य प्रतिक्रिया अशी असायला हवी की आपला मुलगा व्यसनात अडकलाय हे कळल्यावर त्याची खात्री करून घेऊन तो प्रश्न मान्य करणं. त्यासाठी कुटुंबातल्या लोकांनी एकत्र येऊन चर्चा केली पाहिजे. त्याच्या किंवा कुटुंबाच्या आवश्यक तेवढ्या मित्रांना, हितचिंतकांना या प्रयत्नात सामील करून घेतलं पाहिजे. प्रतिष्ठेला जपण्यासाठी जे लोक गुप्तता पाळतात, ते हास्यास्पद ठरत असतात. कारण त्यांना कळण्या आधीच इतर बहुतेकांना ते कळलेलं असतंच. प्रतिष्ठेचा प्रश्न बाजूला ठेवून सगळ्यांनी मिळून या आपत्तीला तोंड दिलं पाहिजे.

थाक दपटशा, उपदेशाचे डोस, प्रवचनांचा व्यसनी मुलावर उलटा परिणाम होत असतो. त्याला जिव्हाळा आणि प्रेम मिळालं तरच तो त्यातून बाहेर यायची शक्यता असते. घरातल्या कुणाला डायबेटिस, कॅन्सर झाल्यावर आपण त्याला दोष देतो का? तसाच हाही एक रोग समजावा.

रोग जितक्या लवकर ओळखता येईल तितका तो लवकर बरा होतो हे तत्त्व इथंही लागू आहे. घरातल्या मुलाच्या वर्तनावरून हा रोग लवकर ओळखता येऊ शकतो. मुलाचे मित्र बदलतात. तो एकटा राहू लागतो. घरातल्या लोकांशी कमी बोलू लागतो. स्वतःच्या कपड्यांकडे, दिसण्याकडे दुर्लक्ष व्हायला लागतं. अभ्यासाचं टेबल पूर्वीपेक्षा अस्ताव्यस्त दिसू लागतं. यावरून पालकांनी सावध व्हायला हरकत नाही. दिवसातल्या विशिष्ट वेळांना अगदी नियमितपणे तो ओढ लागल्यासारखा बाहेर जाऊ लागतो, संडासात जास्त वेळ घालवू लागतो, अभ्यासातली, खेळातली प्रगती ढासळायला लागते, घरातले पैसे, वस्तू चोरीला



जाऊ लागतात... या चिन्हांवरून तर तो व्यसनात अडकतोय हे गृहीत धरून त्याच्या चांगल्या मित्रांकडे पालकांनी चौकशी करायला हरकत नाही. अशा मुलांच्या अभ्यासाच्या टेबलावर खिशात सिगरेटच्या तंबाखूचे कण सापडतात. चेसिंग करणाऱ्यांच्या खिशात, ड्रॉवरमधे सिगरेटच्या चांद्या, काळी पडलेली नाणी सापडू लागतात. त्यांचा चेहरामोहरा बदलू लागतो. हे कळल्यावर न रागावता त्याला चुचकारून सत्य बाहेर काढून पालकांनी, मित्रांनी त्याला उपचारासाठी तयार करायला हवं.

काही सायकियाट्रिस्ट मित्र या व्यसनाच्या बाबतीत फार निराश आहेत. ते म्हणतात, 'आम्ही पेशंटला पाहतो, विथड्रॉल ट्रीट करतो. पुढे फॉलोअपसाठी आठवड्यातून एकदा नियमितपणे बोलावतो. पण एक- दोनदा आल्यानंतर ते येईनासे होतात. मग कधीतरी कळतं की तो परत रिलॅप्स झाला आहे. त्याच्या बाबतीत आम्ही काहीच करू शकत नाही.'

ही अडचण खरी आहे. एकटा सायकियाट्रिस्ट फारसं काहीच करू शकणार नाही. पण या सगळ्या उपचारातलं त्यानं सूत्रधार बनलं पाहिजे. सायकियाट्रिस्ट, पेशंट, कुटुंबीय, सामाजिक कार्यकर्ते या सगळ्याचा मेळ घालून प्रत्येकाची योग्य ती मदत पेशंटला होईल हे त्याने पाहिलं पाहिजे. आम्ही आमच्या समोर आलेल्या पेशंटला सायकियाट्रिस्ट म्हणून तपासणार व ट्रीट करणार येवढं म्हणून भागणार नाही. तर आपली खुर्ची सोडून त्याच्या वस्तीत, घरी गेलं पाहिजे. पेशंटवर नंतर कोण चांगलं लक्ष ठेवू शकेल अशी व्यक्ती हेरून तिला तिचं काम समजावून दिलं पाहिजे.

या दृष्टीने आनंद नाडकर्णी करत असलेले काम म्हणजे आपल्या समाजाला साजेशी उपचारपद्धती शोधून काढायचा एक महत्त्वाचा प्रयत्न आहे असे वाटते. तो मुळात डॉक्टर असला तरी प्रसंगी सामाजिक कार्यकर्ता आहे, अनेक ॲडिक्ट्सना तर तो मित्रच वाटतो. पडेल ते काम करायची त्याची तयारी आहे. त्या त्या वस्तीत जाऊन ग्रुप्स तयार करतो. एखादा रिलॅप्स झाला तर त्याला बऱ्या झालेल्या ॲडिक्टमार्फत तो परत बोलावून घेतो. त्याने बऱ्या झालेल्या पेशंट्सची चांगली टीमच तयार केलेली आहे. त्यांच्यातला 'कोअर ग्रूप' तयार करून त्यांना तो वेगळं ट्रेनिंग देतो.

हे काम करायला सायकियाट्रिस्टच पाहिजे असं नाही. सायकियाट्रिस्ट मदतीला असेल तर कोणीही कार्यकर्ता ते करू शकेल. अशी अनेक माणसं पुढं येण्याची जरुरी आहे.

आनंद चालवत असलेली ग्रूप थेरपी सेशन्स अगदी ऐकण्यासारखी असतात. व्यसनमुक्तांचा असा ग्रूप कुठल्याना कुठल्या निमित्ताने बनला तर परत व्यसनाकडे वळण्याची शक्यता खूपच कमी होते. ' नारकॉटिक ॲनॉनिमस 'च्या (एन्. ए.) मीटिंगचेही असे नंतरच्या अवस्थेत खूप महत्त्व आहे. पण काही एन्. ए. वाल्यांचे काही दुराग्रहही असतात. ' जे काही बरे होतात ते एन. ए. मुळेच होतात. त्या आधी चारदा मेंटलला ठेवले, अनेक सायकियाट्रिस्टची ट्रीटमेंट घेतली तरी त्याचे व्यसन सुटले नाही ते एन्. ए.मधे येऊनच सुटले '. असा त्यांचा दावा असतो. ग्रूप थेरपी मीटिंगविषयी सुद्धा ते म्हणतात, ' तिथं सायकियाट्रिस्ट ती मीटिंग कंडक्ट करत असतो. त्याचं स्थान हे सुपीरिअर असतं. आमच्या इथे सगळे ॲडिक्ट असल्याने लोक अधिक मोकळेपणाने बोलतात. त्याचा त्याला फायदा होतो. '

उपचारात प्रत्येक गोष्टीला स्थान आहे. व्यसनापूर्वीचे असलेले मानसिक रोग किंवा व्यसनी अवस्थेत झालेला मानसिक परिणाम यासाठी सायकियाट्रिक ट्रीटमेंटही घेतलीच पाहिजे. (काही एन. ए. किंवा ए. ए. वाले पेशंटना ही ट्रीटमेंट बंद करा, असे परस्पर सांगत असतात.) ग्रूप थेरपी सेशनमधे सायकियाट्रिस्ट सुपीरियर असला तरी तो चर्चेला योग्य ते वळण देत असतो आणि काही मुद्द्यांपर्यंत चर्चा आणत असतो हा उपयुक्त भाग आहे. एन्. ए. मीटिंगमधे आपण व्यसनापासून लांब राहायचे, रोज त्याबाबत जागरूक राहायचे ही गोष्ट सतत, हडसून खडसून सांगितली जाते. असे ' हॅमरिंग ' होणेही आवश्यक आहे. एन्. ए. किंवा ए. ए. वाले एकमेकांसाठी जेवढे करतात तेवढी पेशंटची घरची माणसेही त्यांच्यासाठी करणार नाहीत. तेव्हा असे अनेक कार्यकर्ते या ॲनॉनिमसने तयार केलेले आहेत.

या सगळ्यांनी आपापल्या रूढ मर्यादा किंवा दुराग्रह बाजूला ठेवले तर याबाबतीत आपण नक्कीच आशादायक चित्र उभं करू शकू.

एन्. ए. वाल्यांमुळे या व्यसनी लोकांच्या उपचारात फार मोठी उभारी आली आहे. मला त्यांचं एक वाक्य फार आवडतं,

' कुठलीही केस ही होपलेस केस नसते. '

० ० ०



परत के. ई. एम. मधला सी. जी. एस्. हॉल.

जवळपास दीड-दोन महिन्यांनी परत इथं येत होतो. तोच फळा, त्यापुढच्या टेबलावर अर्धवट बसलेला तोच आनंद. फक्त समोरचे चेहरे वेगळे. परत आनंद तोच कुत्रा-घंटीचा प्रयोग सांगत होता. मला वाटलं, किती न कंटाळता हे सगळं त्याचं चाललं आहे ! काल संध्याकाळी तो डिपार्टमेंटमधे भेटला तेव्हा खूप नव्या घडामोडी सांगत होता. मंत्रालयातली चक्रं आता हलू लागली आहेत. दारूबंदी डिपार्टमेंटमार्फत स्टिकर्स, पोस्टर्स छापली जाताहेत, बेस्ट बसेसवर मजकूर रंगवला जाणार आहे, मुंबई विद्यापीठातर्फे ब्रोशर्स छापली जाणार आहेत, एक्साईज, कस्टम खात्यातल्या कर्मचाऱ्यांना त्याने ओरिएंटेशन कोर्स देणं सुरू केलंय, टी.व्ही.ने एक सेरीज त्याला देऊ केलीय, ऑल इंडिया लेव्हलचं नारकॉटिक बोर्ड स्थापन होणार आहे . . . असं बरंच उत्साहाने तो सांगत होता. तरीही न कंटाळता ओ. पी. डी.त पेशंट पाहणं, ग्रूप थेरपी सेशन्स घेणं हे मला जास्तच अवघड काम वाटत होतं. मुलं बोलत होती. त्यातनं काही मुलं परत गर्द घ्यायला लागल्याचं कळत होतं. काही नवे कोवळे चेहरे ठरावीक प्रकारचा त्यांचा व्यसनाचा प्रवास सांगत होते.

आज एका मुलाचा ' वाढदिवस ' होता. या क्षेत्रातला वाढदिवस म्हणजे त्याने व्यसन सोडल्याचा दिवस. त्या मुलाने गर्द सोडल्याला आज एक वर्ष पूर्ण झाले होते. तो सफारी सूट घालून आला होता. तो आज त्याची हकीगत सांगत होता. गर्दने भोवती काळे पडलेले अनेक गढूळ डोळे आशेने चमकत होते.

तो सांगत होता, ' अनेकदा वाटायचं, परत एकदाच गर्द घ्यावं. एकदा घेतल्याने काय होणार आहे? पण त्या वेळी मी विचार करायचो, रेल्वे पुढं आडवं पडल्यावर पहिलं चाकच आपला चुराडा करून टाकतं. तसा गर्दची पहिली सिगरेटच आपल्याला खलास करून टाकणार आहे. मग नंतर सगळी गाडी अंगावरून गेली काय आणि नाही गेली काय, काही फरकच राहात नाही. '

मला वाटलं, याला आपण या प्रसंगी काही तरी द्यावं. पण काय देणार ? जवळ कागद होता, आणि पेन होतं. पानांनी बहरलेल्या मोराचं एक चित्र काढलं. आणि त्याला दिलं.

आनंद सांगत होता, ' आपल्या ग्रूपमधला हा पहिला वाढदिवस. इथून पुढं आता हळूहळू बऱ्याच लोकांचे वाढदिवस यायला लागतील. अशी वेळ आली पाहिजे की दर मंगळवारच्या आपल्या मीटिंगला कुणाचा ना कुणाचा वाढदिवस आपण साजरा करू शकलो पाहिजे. काय ? '

असे म्हणून तो नेहेमीसारखं प्रसन्न हसला. सगळ्यांनी हसून माना डोलावल्या.

० ० ०





## पुस्तक मिटण्यापूर्वी . . . .

एखाद्या पुस्तकाला प्रस्तावना लिहावी असा कोणताही अधिकार किंवा ज्ञान मला स्वतःला नाही अशी माझी धारणा आहे. प्रस्तुत पुस्तकाला जोडून मी माझे विचार मांडावे अशी लेखकाची इच्छा होती. या निमित्ताने मलाही या विषयावरचे काही मुद्दे प्रकाशात आणायचे होते. त्यासाठी हा लेखनप्रपंच.

प्रथम मी या पुस्तकातल्या समस्येविषयी लिहिणार आहे. त्यानंतर पुस्तकाच्या लिखाणाबद्दल आणि शेवटी व्यक्तिगतपणे मला स्पर्श करणाऱ्या काही गोष्टींचा विचार.

दहा ऑगस्ट, एकोणीसशे पंच्याऐंशी रोजी मी के. ई. एम्. रुग्णालयात, मनोविकार विभागात 'लेक्चरर' म्हणून काम करायला सुरुवात केली. त्या आधीची एम्.डी. पर्यंतची नऊ वर्षे याच रुग्णालयात घालवली होती. कामाला सुरुवात करताना, मला या समस्येचा संपूर्ण आवाका काही लक्षात आला नव्हता. आज जवळजवळ एक वर्षानंतर हा आवाका, भेडसावणारा वाटावा इतका मोठा झालेला जाणवतो आहे. अक्षरशः वादळाच्या वेगाने आपल्या समाजाला या समस्येने ग्रासलं आहे. ही अशी ब्राऊन–शुगरची साथ आपल्या समाजात का रुजली याची अनेक कारणं आहेत. वाढलेली उपलब्धता, या पदार्थांची घातक शक्ती, वातावरणातले ताणतणाव, कुटुंबातले विसंवाद वगैरे वगैरे. पण आज या निमित्ताने आपल्या साऱ्याच समाजाने अधिक अंतर्मुख व्हावं अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. आणि यामागे एक सलग प्रक्रिया आहे. आज व्यक्ती म्हणून आपण झपाट्याने आत्मकेंद्रित बनत चाललो आहोत. ज्या प्रसारमाध्यमांनी आपल्याला डोळस बनवायचं ती प्रसारमाध्यमेही तशीच आत्मकेंद्रित बनली आहेत. व्यक्ति–व्यक्तींनी बनलेल्या समाजाच्या मूळ संकल्पनेलाच आपण आव्हान द्यायला लागलो आहोत का अशी शंका येण्याइतपत परिस्थिती निर्माण झाली आहे. कुठलीही समस्या, जोवर आपल्या अस्तित्वाला येऊन, प्रत्यक्ष भिडत नाही तोपर्यंत त्या समस्येकडे डोळेझाकच करायची ही सवय आज आपल्या अंगवळणी पडते आहे.

ड्रग्जच्या संदर्भातले ज्ञान दिले तर त्यामुळे ड्रग्जचा वाढता प्रसार होईल हा या डोळेझाकीचाच एक प्रकार आहे. लैंगिक शिक्षण दिले तर समाजातील नैतिकता ढासळेल असा दावा करत आपण अनेक पिढ्यांना या आवश्यक ज्ञानापासून दूर ठेवलं. आणि त्याचं प्रायश्चित्त आपण, लैंगिक समस्यांच्या वाढत्या संख्येमधून घेत आहोतच. ज्ञान देण्याच्या आवश्यकतेलाच आपण आव्हान देतो ही कल्पना फार गंभीर आहे. ज्ञान कसं द्यावं, कोणती खबरदारी पाळून द्यावं या तपशिलाच्या भागावर मतभेद असू शकतात. पण ज्ञान द्यावं की नाही यावर असू शकत नाहीत.

ज्ञान दिल्याने जर अशा साथी वाढणार असतील तर त्यामुळे आपल्या सामाजिक समंजसपणालाच कुठेतरी धक्का पोहोचतो आहे हे मात्र आपण लक्षात घेत नाही. ब्राऊन शुगरची समस्या वाढण्यामागे अज्ञानाचा फार मोठा वाटा आहे हे आपण लक्षात घ्यायला हवं.

या निमित्ताने, आई-वडील व मुलं यांच्यातल्या विरळ होत जाणाऱ्या संवादाचाही आपण विचार करणं अगत्याचं ठरणार आहे. सोळा- अठरा वर्षांच्या बहुतेक कॉलेज तरुणांसाठी ' शिक्षणातून व्यक्तिमत्त्वाची सर्वांगीण वाढ ' हे तत्त्व कागदावरच राहिलेलं आहे. पुन्हा त्याच आत्ममग्न वृत्तीतून आलेली ' करियर ' नावाची एक भयानक गोष्ट. मग अवांतर हालचालींच्या उनाडक्या तरी होतात, किंवा सतार शिकणं वा जॉगिंग करणं या गोष्टी फक्त फॅशनच्या पातळीवरच शिकल्या जातात. प्रस्तुत पुस्तकामधून या सर्व संदर्भातली प्रश्नचिन्हेही आपल्यापुढे उभी सहावीत अशी अपेक्षा आहे.

आम्ही डॉक्टरही याच प्रस्थापित मूल्यव्यवस्थेतून आलो आहोत हे लक्षात घेतलं तर दोन धोक्यांची जाणीव आम्ही ठेवायला हवी. आता गल्लोगल्ली ' डिटॉक्सिफिकेशन सेंटर्स ' यायला वेळ लागणार नाही. ठिकठिकाणचे वैद्यकतज्ज्ञ आपापल्या रुग्णालयांमध्ये ' खास विभाग ' चालू करतील. त्याला भरघोस मदतही मिळेल. कुठल्याही समस्येवर आपण ' इन्स्टन्ट बँडएड ' उत्तरे शोधून काढण्यात वाकबगार आहोतच. वैद्यकयंत्रणेच्या हातामध्ये ' ब्राऊन शुगर 'च्या निमित्ताने आणखी एक कुऱ्हाड मिळाल्याचं दृश्य लवकरच दिसू लागण्याची शक्यता आहे. या समस्येचा विचार फक्त वैद्यकीय पातळीवर होत राहिला तर हा धोका जास्त वाढणार आहे.

कोणत्याही व्यक्तीच्या सहनशीलतेला म्हणजेच ' पेशन्स 'ला मर्यादा असते. ड्रग-ॲडिक्टवर उपचार करताना ही सहनशीलता पणाला लागते. समाजद्रोही



किंवा गुन्हेगारी वृत्ती न दाखवलेला ड्रग-ॲडिक्ट विरळाच. पण, म्हणून काही प्रत्येक वेळी तो मुळापासूनच तसा असेल असं नाही. पण मनोविकारतज्ज्ञांसाठी ' सायकोपॅथिक पर्सनॅलिटी डिसॉर्डर ' असं म्हटलं की पुढे प्रयत्न करायची जरूरच राहात नाही. काढा त्याचं विड्रॉअल आणि द्या त्याला सोडून. आम्हा मनोविकारतज्ज्ञांच्या भाषेत या निदानाला ' पीडी ' म्हणतात. म्हणजे पर्सनॅलिटी डिसॉर्डर. ड्रग ॲडिक्टवर पीडीचा शिक्का बसला की आमच्या जगात तो गुन्हेगार, बहिष्कृत असतो. माझ्या मते, अशा ' पीडी ' रुग्णांवर उपचाराचे कळकळीचे प्रयत्न करणारा डॉक्टर अधिक चांगला, मग तो शेवटी ' रिझल्टस् 'च्या बाबतीत अपयशी का ठरेना. आम्हा डॉक्टरांना सहसा ' रिझल्टस् ' देणारे रुग्ण आवडतात. म्हणून जिथे रिझल्टस् मिळण्याची शक्यता कमी तिथे आम्ही काम करायचेच नाकारतो. ड्रग ॲडिक्ट हा ' वाईट पेशंट ' आहे हे तत्त्व आमच्या हॉस्पिटल कल्चरमध्ये सतत बिंबवलं जात असतं. याचा अर्थ ड्रग ॲडिक्ट देवदूत असतात असं नव्हे. पण ' नायदर एंजल्स बिफोर, नॉर डेविल्स् आफ्टर ' ही वृत्ती या रुग्णांच्या बाबतीत घेणं अनेक डॉक्टरांना कठीण जातं.

असा आदर्श दृष्टिकोण असला तरीही एक व्यक्ती म्हणून डॉक्टरचे प्रयत्न किती एकाकी व अपुरे असतात याचा प्रत्यक्ष अनुभव मला आहे. म्हणूनच उपचारांच्या यशाचे कोणतेही अतिशयोक्त दावे कुणीही करू नयेत. योग्य उपचार आणि रुग्णाची इच्छाशक्ती यांचा मिलाफ व्हावाच लागतो. त्यातही रुग्णाची इच्छाशक्ती अधिक महत्त्वाची. ती मुळात असली पाहिजे. उपचारांनी ती फुलली पाहिजे. शंभरातून वीस-पंचवीस वेळाच हे असं घडतं हेही कबूल केलं पाहिजे.

म्हणूनच, प्रतिबंधन हाच सर्वोत्तम उपाय आणि त्यासाठी ज्ञान होणं अत्यावश्यक.

या दृष्टिकोनातून अनिल अवचटांचा हा प्रयत्न वेगळा व उल्लेखनीय ठरावा. त्यांच्या लिखाणाची शैली ' रिपोर्ताज् 'सारखी असल्याने त्यात ' इन्फर्मेशन ' किंवा ' माहिती ' कमी असावी असा त्यांचा कटाक्ष होता. मी जे पाहिलं, तो अनुभव वाचकांपर्यंत पोहोचवावा असा त्यांचा हेतू मुळात असावा. पण त्यांनासुद्धा माहिती देण्याचं महत्त्व पटलं असावं. कारण पुस्तकाच्या शेवटच्या अर्ध्या भागात बरेच शास्त्रीय ज्ञान या ना त्या कारणाने आलं आहे. ' मी ॲनॅलिसिसमध्ये पडणार नाही. ' असं अवचट म्हणाले होते, पण शेवटी त्यांनी त्यालाही पुसटसा हात घातला आहे. या विषयामुळे त्यांच्या शैलीचं, पुस्तकाच्या शेवटी जरा ' डिपार्चर ' झाल्यासारखं वाटतं. त्यावर समीक्षक काहीही म्हणोत. पण त्यातली माहिती (इन्फर्मेशन) वाचकांपुढे आल्यामुळे मी मात्र

समाधानी आहे. लिखाणाच्या निमित्ताने डॉ. अवचट जेव्हा दीड महिना माझ्याबरोबर फिरायचे तेव्हा आमचं या विषयावर सतत बोलणं व्हायचं. 'अमुक अमुक इन्फर्मेशन घाला बरं का' असं मी म्हटलं की ते म्हणायचे, 'तुझा दृष्टिकोण शास्त्रीय डॉक्टरचा आहे. माझा फक्त निरीक्षकाचा' पण शेवटी बरीच इन्फर्मेशन या पुस्तकातून बाहेर येते आहे.

अवचटांच्या निरीक्षणाबद्दल मी लिहावं असं नाही. गंमत म्हणजे ते आसपास असताना आपण जराही 'कॉन्शस' होत नाही. त्यांचं अस्तित्व नसल्यासारखं असतं. ओपीडीच्या गर्दीत ते शांतपणे 'ओरिगामी'चा कागद घेऊन बसायचे. मधूनच माझ्याशी किंवा पेशंट्सशी बोलायचे. पण बहुधा त्यांच्या सर्व संवेदना, तो अनुभव फटाफट् टिपत असणार. लिखित स्वरूपातली टिपणं तर ते फारसे काढत नव्हते. 'दृष्टि-स्मृती' (व्हिज्युअल मेमरी) वर त्यांचा जास्त भर असावा. आणि ते लिखाणातून जाणवतंच. हे सगळं करताना त्यांनी स्वतः या विषयाचा अभ्यास केलेला आहे. हा केलेला अभ्यास लिखाणातून जाणवू नये असा त्यांचा कटाक्ष असावा. नाहीतर लिखाण कोरडं होईल असं त्यांना वाटत असावं की काय ठाऊक नाही. पण त्यांच्यामुळे मी या विषयावरची किमान बारा- चौदा तरी नवीन पुस्तकं वाचली.

आता तिसऱ्या भागाकडे येतो. या पुस्तकाचा काही भाग महाराष्ट्र टाईम्समध्ये प्रसिद्ध झाल्यावर माझ्यावर प्रतिक्रिया व पत्रांचा वर्षाव झाला. परवा एका व्याख्यानानंतरच्या प्रश्नोत्तरांच्या कार्यक्रमात "वैद्यक व्यवसायातील प्रलोभनं सोडून आपण या विषयाकडे कसे वळलात?" असा प्रश्न विचारला. माझ्याबद्दलचा आदर व्यक्त करणारीसुद्धा बरीच पत्रे आली. या साऱ्या संदर्भात थोडे स्पष्टीकरण देत आहे.

पहिली गोष्ट म्हणजे माझे या संदर्भातले सारे उपक्रम हा माझ्या नोकरीचा एक भाग आहेत. त्यात समाजकार्य किंवा स्वतः फार मोठी झीज सोसणं वगैरे काहीही नाही. मनोविकारशास्त्रामधल्या इतर विकारांवरही मी जितक्या तळमळीनं काम करेन तसेच काम मी याबाबतीत करतो. या समस्येबद्दल, एक व्यक्ती म्हणून मी एक रान उठवेन आणि माझा 'खारीचा वाटा' पूर्ण करेन ही माझी भावना आहे. माझ्या परीने वेगवेगळ्या आघाड्यांवर मी या समस्येला भिडलो आहे. त्याचे परिणाम मला ठाऊक नाहीत. मात्र कुठे थांबावं याची जाण मला आहे. माझा वाटा पूर्ण झाल्यावर मला प्रसिद्धी वा तत्सम गोष्टींसाठी हे क्षेत्र वापरायचे नाही. लवकरच माझी या विषयावरची शंभर भाषणे पूर्ण होतील.



तत्पूर्वी मी किमान पन्नास वक्त्यांना या विषयावर तज्ज्ञ बनवण्याचा संकल्प सोडला आहे. त्यानंतर मी या विषयावरची माझी भाषणे बंद करणार आहे. दूरदर्शनवरील मालिका मार्गी लागली आहे. या विषयावरच्या एका 'टेक्स्ट बुक'-वर माझं काम चालू आहे. वेगवेगळ्या प्रसारमाध्यमांचा वापर कसा करता येईल याबद्दलची माझी मदत मी किती संबंधित व्यक्तींना कशी दिली आहे त्याच्या तपशीलात मी जात नाही. पण तिथेही मी थांबणार आहे.

प्रस्तुत पुस्तकामुळे नकळत का होईना माझ्याभोवती एक वलय निर्माण झाले आहे. त्याचा अनुभव मी घेतो आहे. या वलयाचा बळी व्हायचं मात्र मी नाकारणार आहे. किंबहुना त्या म्हणूनच त्या वलयाला छेद देण्यासाठी हे लिहित आहे. मी अजून एक वर्षानंतरही या समस्येवर काम करत राहीन. पण ते काहीतरी वेगळ्या प्रकारचं असण्याची शक्यता नाकारता येत नाही. या समस्येचं उत्तर काढायचं असेल तर त्यासाठी समाजातील प्रत्येक घटकाने आपापला वाटा उचलायला हवा. कोणत्याही एखाद्या समस्येवरचे 'मसीहा' निर्माण करून प्रश्न सुटत नसतात. वैद्यकक्षेत्रात असे झाले तर, उपचारांमधला रुग्णाचा आवश्यक सहभाग कमी होत जातो. माझ्या उपचारांमध्ये मला कुठेही अफाट यश मिळालेलं नाही. माझा 'फेल्युअर रेट'इतरांइतकाच आहे. दर चारांमधला एकच पेशंट सुधारतो. पण नक्की कुठला सुधारणार हे ठाऊक नसल्याने चारही जणांवर श्रम घेणं हे आपल्या हातात आहे, आणि एकाचं सुधारणंही तितकंच महत्त्वाचं आहे. वैद्यकशास्त्रातले सारेच हिशोब टक्केवारीत बसवण्याइतके सोपे नसतात. मनोविकारशास्त्र या माझ्या वैद्यक शाखेवर माझं मनापासून प्रेम आहे. या क्षेत्रात काम करणं म्हणजे एक प्रचंड मोठा कॅनव्हास आहे. या कॅनव्हासच्या विस्तारत जाणाऱ्या क्षितिजरेखा माझ्या लक्षात आणून दिल्या या ब्राऊन शुगरच्या समस्येने. अजून या कॅनव्हासवर बरेच काही करायचं आहे. . . मुख्य म्हणजे विस्तारणाऱ्या क्षितिजाला अरुंद बनवून, मुठीत बसवण्याच्या हव्यासापासून दूर रहायचं आहे.

—आनंद नाडकर्णी

